PUDHARI KE PENDHARI

पुंढारी कीं पेंढारी

1814

जोशी, मोरेश्वर वासुदेव
पुढारी की पेंढारी आणि इतर विनोदी लेख. मुंबई; पु. वा. जोशी; मुंबईवैभव, मुंबई; 1930; 8x162; 6.2x8.2 सचित्र; रु. 1.




Imperfect: p. i-iv incl. t. p. and p. 1-2 wanting.

Datar
17/10/68.

18 cm

शिकायला असतो, त्यानें मला असें सांगितलें होतें, कीं दिगूभाऊचा कित्येक संस्थांशीं जिव्हाळ्याचा संबंध आहे. एका वर्तमानपत्राचा तो संपादकही आहे. थोडक्यांत सांगायचें म्हणजे ज्याला उचलबांगडी करून आम्हांला शाळेंत न्यावें लागे, तो दिगू आतां बडा पुढारी बनला होता. मग त्याला भेटण्यांत मला अभिमान वाटल्यावांचून कसा राहील बरें ?

माझा जन्म कोंकणांत गेलेला असला, आणि मी एक भिक्षुकीपेशाचा आपला एक खेडवळ असलों, तरी देशभक्त आणि पुढारी हे शब्द मला अगदीं माहीतसुद्धां नसतील, असें तुम्हीं समजूं नका. मी थोडींफार वर्तमानपत्रें वाचणारा मनुष्य आहें. आणि जरी मीं कोणा पुढाऱ्याला प्रत्यक्ष पाहिलेलें नसलें, तरी पुष्कळ देशभक्तांचीं आणि पुढाऱ्यांचीं नांवें माझ्या डोळ्यांखालून गेलेलीं आहेत. पुढारी कसा असतो, आणि कसा दिसतो, हें पाहण्याची मला अगदीं भारी इच्छा ! पण खेडेगांवांत आपलें सारें आयुष्य गुदरणाऱ्या मजसारख्या अभाग्याच्या तो कसा दृष्टीस पडावा ? आमच्या इकडे रस्त्यांनीं जातांना जसें सहज गायगुरूं किंवा कुत्रें मांजर दृष्टीस पडतें, तसें पुण्या–मुंबईसारख्या शहरांतून सहज एखाद्या गल्लींतून गेलें तरी सहज दोनतीन पुढारी आणि दोनतीन देशभक्त दृष्टीस पडतात, असें मीं ऐकिलें होतें. परंतु त्या शहरांतून जाण्याचा आपणांला योग कसा येणार आणि ते पुढारी आपल्याला कसचे दिसणार, असेंच मी समजत होतों. पण 'पुरुषस्य भाग्यं' या न्यायानें, आज नुसता पुढारी पाहण्याचाच नव्हे, तर एका पुढाऱ्याकडे उतरण्याचा बहुमान मला लाभणार होता. मग जिन्यांतल्या हालांचें दुःख मी विसरून गेलों, तर त्यांत कसलें आश्चर्य ?

जिना चढून वर गेल्यावर, टीचभर ग्यालरींतून, वाटेंत लागणाऱ्या दारांतून सिंहावलोकन करीत, आणि ग्यालरींतील कोळशांच्या पोत्यांना आपटत व वर टांगलेल्या तुळशीच्या वगैरे कुंड्यांना आदळत, मी पुढें पुढें चाललों होतों. शेवटीं अखेरच्या एका बंद केलेल्या दाराशीं जाऊन मी थबकलों. कारण, त्या दारावर एक रंगरोगण लावलेली भव्य पाटी

लटकत होती. रस्त्यांतील समोरच्या ग्यासच्या बत्तीच्या उजेडांत ती पाटी नुसती लखलखत होती:—

| |
|---|
| मि० **दिगूभाऊ लुडबुडे.** |
| ऑ० उपसंपादक, **मादुंगा समाचार.** |
| असि० सेक्रेटरी, **स्त्रीदास्यविमोचनसंघ.** |
| व्हाइस प्रेसिडेंट, **होलिकासंमेलन कमिटी.** |
| ऑन० सेक्रेटरी, **शिशुसप्ताह कमिटी मादुंगा.** |

मीं त्या पाटीकडे एकदां पाहिलें, एकदां स्वत:कडे पाहिलें, आणि ' धन्य झालों ' असे समाधानाचे सहजोद्गार माझ्या तोंडून एकदम बाहेर पडले ! " दिगू, बेट्या शाबास ! तूं आज कुळाचें नांव केलेंस " असें मनाशीं पुटपुटून मी आनंदाच्या भरांत एकदम दार ढकलून आंत घुसलों. तों दिगू आपल्या खुर्चीवरून ताड्कन् उठून माझ्या अंगावर एकदम संतापून आला—" कोण माणूस अहां कीं हैवान अहां ? तुम्हां लोकांना कांहीं मॅनर्स आहेत का ? चालले एकदम दार ढकलून आंत घुसायला ! बाहेरची बेल वाजवायची माहीत नाहीं ? " डोळे फाडून आणि नाक फेंदारून दिगू वसकन् माझ्या अंगावर ओरडून म्हणाला. मी तर जागच्या जागींच थंडा झालों !

आम्ही खेडवळ माणसें. पण आम्ही सुद्धां कोणी नवखा माणूस आमच्या घरीं आल्यास त्याला ' या बसा ' म्हणतों, आणि दिगू तर शहरांतला विद्वान् गृहस्थ आणि त्यांतून पुढारी ! तेव्हां तो माझ्यासारख्या आपल्या जुन्या सोबत्याला केवढ्या तरी अगत्यानें वागवील, अशी माझी खेडवळ समजूत. पण घरांत शिरल्याबरोबर जेव्हां त्यानें माझें असें दिव्य स्वागत केलें, तेव्हां मला किती चमत्कार वाटला म्हणून सांगूं ? बरें, त्यानें अंगा-

वर यायला मीं तरी त्याचें असें काय घोडें मारलें होतें, तें मला कांहीं केल्या समजेना !



'बेल' म्हणजे काय, तो कोठें असतो, तो वाजवायचा कसा, आणिं कां, हें मला काय ठाऊक ? खरें म्हणाल, तर मला दिगूचा थोडासा रागही आला. आणि, मी काखेंतलें बोचकें खालीं ठेवून म्हणालों, "दि......"

"ओहोहोहो !" दिगू एकदम हंसत हंसत मध्येंच म्हणाला. "कोण बंड्या ? अरे तूं का तो ? मीं म्हटलें कोण आहे अन् काय. अरे उभा कां ? बस, बस."

"दिगू......"

"समजलों, समजलों !" मला पुढें बोलूं न देतां दिगू म्हणाला, "मी असा अंगावर कां आलों हेंच तूं विचारणार ना ? अरे, हें चालायचेंच ! सार्वजनिक कार्यांत असें हें चालायचेंच !......"

"सार्वजनिक का......"

"हो हो ! सार्वजनिक कार्यांत !" दिगू नाकाच्या बोंडीवरील चष्मा हातांत घेऊन तो साफसूफ करीत मध्येंच म्हणाला. "सार्वजनिक काम म्हणजे तूं काय समजलास ? तुम्हां खेड्यांतील लोकांना सार्वजनिक

कामांची कल्पना तरी आहे ? सार्वजनिक कामांतल्या–आणि त्यांतून ज्याचा पांचसहा महत्वाच्या संस्थांशी विशेष संबंध आहे, अशा माझ्या-सारख्या–मनुष्याला किती विवंचना असतात, किती जबाबदाऱ्या असतात, अन् किती महत्वाचे प्रश्न डोक्यांत गोंधळ घालीत असतात, त्याची तुम्हांला काय कल्पना ? आतांच पहा ना ? मी आमच्या मार्टुंगा समाचा-राच्या अंकासाठी एक अगदीं जिव्हाळ्याच्या प्रश्नावरचें जहाल स्फुट लिहीत बसलों होतों. इतक्यांत तूं असा अचानक एकदम आंत घुसल्यामुळें माझी विचारांची लिंक खळकन् तुटून गेली आणि राष्ट्रकार्याची अशी विनाकारण एकाएकीं घाण कोणी केली, म्हणून संतापून मी हें असें केलें ! मला काय माहीत, कीं तो तूंच असशील म्हणून ? बाकी अशा वेळीं आम्ही बापाला सुद्धां बाबा म्हणायचे नाहीं हो ! सार्वजनिक कामापुढें आम्ही कोणालाच मोजीत नाहीं. हॅः हॅः हॅः ! मग मागून हवें तर सातदां पायां पडूं ! "

दिगूचें हें सडेतोड आणि विद्वत्ताप्रचुर भाषण ऐकून माझा सारा राग पार वितळून गेला ! बरोबरच आहे. ज्याला राष्ट्रकार्याची अखंड तळमळ लागून राहिली आहे, त्याला माझ्यासारख्या मशकाची किंमत किती असणार ? आणि कां असावी ? दिगूचें तें भाषण ऐकून मी आपला अपमान तर विसरलोंच, पण अशा महानुभावाचा सहवास आपल्याला दोन दिवस लाभणार, या कल्पनेनें मला धन्यताही वाटली.

" दिगूभाऊ, अरे, तूं एवढा पुढारी एकाएकी झालास तरी कसा बाबा ? " दिगूच्या लांबच्यालांब आणि टोंकदार कालरीकडे कौतुकानें पहात मी विचारलें.

" एकाएकीं ! " दिगू आश्चर्यानें म्हणाला, " बड्, मी एकाएकीं पुढारी झालों, असें का तुला वाटतें ? वेडा आहेस झालें ! अरे, हा पुढारीपणा मिळवायला किती खस्ता खाव्या लागल्या आणि किती डोकें लढवावें लागलें तें तुला कसें कळणार ? "

" तूं सांगितलेंस म्हणजे कां नाहीं कळणार ? दिगू, तूं सांगून सुद्धां मला कळणार नाहीं, इतका का मी दगड आहें ? "

"कोण म्हणतो ? पण तूं मला एकाएकीं पुढारी झालास, असें म्हणालास, त्याचें मला मोठें नवल वाटलें."

"मग पहिल्यापासूनच तुझी हकीगत मला सांग पाहूं ?" मी आपली चंची सोडून आणि मांडीचा जेठा मारून दिगूला विचारलें. "तूं पहिल्या प्रथम काय केलेंस ?"

"हं: ! म्हणे पहिल्याप्रथम काय केलेंस ! जसा कांहीं सत्यनारायणाची कथाच ऐकायला बसला आहे ! अरे शहाण्याच्या कार्ट्या, असं आधीं कुणी विचारतात तरी का ? आणि विचारलें, तरी कोणता शहाणा त्याला आपल्या मनच्या सांगेल ? आतां तुझी गोष्ट निराळी ! कारण तूं माझा बाळपणचा जिगरदोस्त, शिवाय, तुला या गोष्टी सांगितल्यानें त्यांतल्या कांहीं कृतींतही तं आणं शकशील ! तसा तूं चलाख डोक्याचा आहेस......"

"अरे, माझ्या डोक्याची तारीफ अम्मळ मागाहून केलीस तरी चालेल ! पण प्रथम तुझी हकीगत सांग पाहूं ? प्रथम तूं काय केलेंस ?"

"प्रथम मी नोकरीसाठीं वायरटासारखा वणवण हिंडलों. अलीकडे नोकऱ्या आहेत कुठे ? आणि त्यांत आमचें शिक्षणही फारच झालेलें ! शेवटीं महाप्रयासानें एकदांची वाडीबंदरांत नंबरटेकरची नोकरी लागली ! तसं म्हटलें तर माझा सारा जन्म त्या नंबरटेकरींतच जायचा. आणि शेवटीं यमराजाचा नंबरटेकर आमच्यावर आपला नंबर टेंकायचा ! पण माझा जन्म नंबरटेकर होण्यासाठीं नव्हता. म्हणून एके दिवशीं..."

"एके दिवशीं काय झालें ?" मीं उत्सुकतेनें विचारलें.

"कांहीं विशेष प्रकार घडला, असें नाहीं. पण एका गुजराथी व्यापाऱ्याची आणि माझी थोडीशी ओळख झाली आणि त्या ओळखीच्या जोरावर मी त्याच्या पेढीवर एक लहानशी कारकुनीची असामी पटकावली ! तो गुजराथी शेठ खादीवाला होता. म्हणून मीही एक खादीचा सदरा आणि गांधी टोपी पेहरूं लागलों. आणि तेंच माझ्या पुढारीपणाचें मूळ !"

## पुढारी कीं पेंढारी ?

" अरेच्या ! पण तो खादीचा सदरा आतां कोठें दिसत नाहीं तो ?" कुत्र्याच्या कानासारख्या लांब कॉलरीच्या त्याच्या अंगांतल्या तुकतुकीत खमिसाकडे पहात मीं विचारिलें.

" अरे आतां तो कसा दिसेल ! बाबा, नदीचें कूळ, आणि पुढाऱ्याचें मूळ कधीं शोधूं नये ! मी अजून खादीलाच चिकटून बसलों असतों, तर माझा आज होणारा बोलबाला कधीच झाला नसता. खादी आणि असहकारिता यांनाच चिकटून बसणाऱ्यांची आज कशी फजिती झाली आहे ती पहातोस ना ?"

" मग तेव्हां तरी खादी कशाला वापरीत होतास ?"

" वाहवा ! त्या वेळीं खादीशिवाय कोण विचारतो ? त्या वेळीं असहकारितेच्या चळवळीचा ऐन जोर होता. त्या वेळीं विद्वत्ता, वावदूकता वकिलीपेंच, यांना कवडीची किंमत नसून, त्या चळवळीची उभारणी निव्वळ स्वार्थत्यागावर होती. माझ्या ठिकाणी विद्वत्ता नाहीं, पदव्या नाहींत; पण मोठा माणूस होण्याची तर मला मोठी महत्त्वाकांक्षा ! कसेंही करून आपलें नांव व्हावें, ही तर मला मोठी हौस ! त्यामुळें ही असहकारितेची आणि खादीची चळवळ आपल्या चांगली उपयोगी पडणार, ही मीं आपल्या मनाशीं पक्की खूणगांठ मारली. या चळवळींत स्वार्थत्याग लागतो पण या गुणाचा पहिला अर्धा भाग ( स्वार्थ ) तर माझेजवळ पुरेपूर होताच ! तेव्हां देवाचें नांव घेऊन मी या चळवळींत पुढाकार तर घेतलाच ! त्या वेळीं मी वांद्र्याच्या पलीकडे × × × येथें रहात होतों. प्रथम मी खादीचा सदरा आणि टोपी वापरूं लागलों आणि थोडेसे दिवस लोटतांच मीं गांधीटोपीही वापरण्याचें टाकलें. आणि नेसूं एक खादीचा पंचा आणि अंगांत एक खादीचें कुडतें अडकावून मी बोडकाच गांवांत हिंडूं लागलों. थोडक्यांत सांगायचें, म्हणजे गांधींची हुबेहूब नक्कल मी उठवली ! आणि त्याचा अगदीं योग्य परिणाम झाला ! गंभीर मुद्रेनें, अनवाणी पायानें आणि उघड्या डोक्यानें मी जेव्हां गांवांत फिरूं

लागलों, तेव्हां गांवांतलीं तरुण पोरें माझेकडे आदरानें पहात नमस्कार करूं लागलीं ! हळुहळू माझें वजन वाढूं लागलें. आपला जम बसूं लागला आहे, असें ताडून मीही जास्त जास्त प्रयत्न करूं लागलों. गांवांत दुसरेही एकदोन प्रतिष्ठित गृहस्थ खादीभक्त असून ते बोलकेही होते. परंतु त्यांना मागें सारून मला पुढारीपणा पटकवायचा होता. पण मीं वरून मात्र तसें कांहीं दाखविलें नाहीं. मी आपला नेहमीं त्यांचेभोंवतीं घोंटाळूं लागलों आणि त्यामुळें खरा कळकळीचा ' स्वयंसेवक ' असा माझेविषयीं त्यांचा ग्रह होऊं लागला !

" बाकी मी मनांत समजून होतों, कीं नुसत्या खादीनें कांहीं आपण पुढारीपण मिळवूं शकत नाहीं. धडाडीची व्याख्यानबाजी उडविल्याशिवाय आपला बोलबाला होणार नाहीं. पण ती कला कांहीं माझ्या अंगांत मुळींच नव्हती ! दीर्घ वाचन नाहीं, वक्तृत्व नाहीं, पण धाडस मात्र माझे अंगीं होतें. आणि त्याच्या जोरावर मीं एक दिवस संधि साधून एक जोरदार व्याख्यान शिलगावलें ! श्रोत्यांना कांहीं त्या दिवशीं तोटा नव्हता. त्या दिवशीं एका साधारण प्रसिद्धपैकीं असहकारवाल्याचें व्याख्यान व्हायचें असल्यामुळें, आसपासच्या गांवचे लोकही लोकलगाड्यांनीं येत होते. आमची स्वारी नेहमींप्रमाणें व्यासपीठावर पुढाऱ्यांत चमकत होती, हें सांगायला नकोच !

" व्याख्यानाची वेळ होऊन गेली, तरी वक्त्याचा पत्ता नाहीं. तो बहुधा येतही नाहीं, असा कयास झाला. लोक तर बसून कंटाळले होते. शेवटीं या आलेल्या सोन्यासारख्या संधीचा उपयोग करून घेण्याचें मीं ठरविलें. आणि बोलण्याकरितां मी उभाही राहिलों ! मग काय विचारतोस ? माझें भाषण तें ! त्याला ना शेंडा ना बुडखा ! पण घाबरलों मात्र नाहीं. डोळे फिरवून आणि हाताची मूठ घट्ट वळून मी खूप मोठ्यानें आणि आवेशानें बोलत होतों आणि मधून, हाताला लागेल त्याची पर्वा न करितां, हाताची मूठ टेबलावर दाणदाण आपटीत होतों. शेवटीं आवेशाच्या भरांत येऊन

मी जोरानें म्हणालों—' लोकहो ! असे बसलांत काय ? उठा ! उठा ! ती मातृभूमि तुम्हांला हांका मारीत आहे, त्या ऐकूं येत नाहीत काय ? ' आणि काय सांगूं तुला ! माझ्या त्या भाषणाचा त्या लोकांवर फारच विलक्षण परिणाम झाला ! मी उठा म्हणतांच सगळेजण खरोखरच उठून उभे राहिले ! आणि मी समोर हात करून—' ती मातृभूमि तुम्हांला हांका मारीत आहे, त्या ऐकूं येत नाहीत काय ? ' असें म्हणतांच बेटे खरोखरच आपले चालूं लागले !



" मग काय ? हां हां म्हणतां तें सभागृह पार ओस पडलें ! आणि मग मीही विजयी वीराप्रमाणें आपल्या घराकडे वळलों. इतकें परिणामकारक व्याख्यान मुंबईजवळच्या त्या पंचक्रोशींत कधींच झालें नसेल ! पण मुंबईच्या वर्तमानपत्रांनीं त्याचें अगदी उलटें वर्णन छापून प्रसिद्ध केलें:— ' ज्यांच्यासाठीं लोक एवढ्या उत्सुकतेनें आले होते, ते तर मुळीं आलेच नाहींत आणि शेवटीं श्री० दिगूभाऊ ह्यांचें दिव्य वक्तृत्व ऐकण्याचें लोकांच्या कपाळीं आलें ! त्यांचें भाषण इतकें हृदयस्पर्शी झालें, कीं अवघ्या पांच मिनिटांचे आंत त्या सभास्थानीं एक चिटपांखरूंही शिल्लक राहिलें नाहीं ! जवळपासच्या वृक्षलताही आपणांस पळावयास पाय नाहींत याबद्दल अश्रु ढाळीत होत्या ! '

" बरोबरच आहे. माझ्यासारख्या उदयोन्मुख पुढाऱ्याचें या लोकांना बरें कसें पाहावेल ? पण कांहीं का असेना ? त्या दिवसापासून माझा बोलबाला आपला वाढतच गेला. आणि मीं ही चळवळ काढणाऱ्या महात्माजींना शतशः धन्यवाद दिले. पुढें थोड्याच दिवसांत मला त्यांना शिव्या देण्याची पाळी येणार आहे, हें मला तेव्हां कसें कळणार ? पण ते दिवसही लवकरच आले ! मांजरीच्या पंज्यांप्रमाणें ही असहकारितेची चळवळ कायदेभंग, पिकेटिंग असलीं आपलीं तीक्ष्ण नखें हळूहळू बाहेर काढूं लागली ! आणि काय सांगावें, आमच्या गांवच्या त्या तरुण मूर्ख पोरांनीं दारूच्या पिठ्यावर पिकेटिंग करण्याचें ठरविलें !

" मी पुढारी ! तेव्हां अर्थातच ते माझ्याकडे सल्ला विचारायला आले ! त्यांचा तो बेत ऐकून मला तर थरकांप सुटला ! आतां काय करावें ? पिके-टिंग करूं नका म्हणण्याची तर सोय नव्हती आणि करा म्हणून तरी कुठल्या तोंडानें सांगावयाचें ? मी त्यांचा पुढारी ! तेव्हां मलाही त्यांच्या-बरोबर पिकेटिंग करणें भाग. पोलिस तर काय नुसते टपलेले असणार ! एक पिकेटिंग म्हटलें, कीं पोलिस, त्याचा दंडुका, कोर्ट आणि शेवटीं तुरुंग. हा सगळा सिनेमा माझ्या डोळ्यांसमोर लख्ख उभा राहिला ! कुठली झक मारली आणि पुढारी झालों, असें मला झालें."

" मग पुढारीपणा तूं सोडून द्यावा कीं नाहीं ? "

' अरे, पुढारीपणा असा चुटकीसरसा सोडतां येत नाहीं. एखादी चळ-वळ आपल्यानें झेंपेनाशी झाली, तर ती चळवळ सोडायची; पुढारीपणा कांहीं सोडायचा नाहीं. वेडाच आहेस ! आपली नालायकी कबूल केली, तर तो जातिवंत पुढारीच नव्हे ! आपण नालायक नसून, ती चळवळ--तो मार्गच बेवकूब आहे, असें म्हणून मोकळें व्हायचें. हें लक्षांत ठेव, की तत्त्वें नालायक असतात. पुढारी हा नेहमीं पुढारीच असतो ! असो. शेवटीं मला लोकांच्या त्या बेताला मान तुकावणें भाग पडलें. त्यांना मी स्वयंसेवक बनविलें आणि मी त्यांचा कॅप्टन् झालों ! तुम्ही पिकेटिंग करा, आणि मी मधून मधून पहाणी करीन, असें त्यांना सांगितलें !

"झालें! दुसरे दिवशीं पिकेटिंगला सुरवात झाली. दोन स्वयंसेवक पिठ्या-जवळ उभे राहून 'दारू पिऊं नका' म्हणून सांगूं लागले. मी कॅप्टन् असल्या-मुळें घरींच बसलों होतों! पण दिवसांतून निदान एकदां तरी मला गुत्त्यावरून फेरी मारणें भाग होतें. शेवटीं संध्याकाळचे वेळीं पिठ्यापाशीं हळूहळू आलों. आणि पिठ्यासमोरचा पोलिस जवळच्या झाडावरील कावळ्यांचें भांडण पहाण्यांत गुंतला आहे, आणि




पिठेवाला दारूच्या पिंपाच्या घालमेलीत गुंतला आहे, असें पाहून एक डोळा पोलिसाकडे व दुसरा डोळा पिठेवाल्याकडे लावून, मी वांकून, पाऊल न वाजवितां, लांब लांब ढेंगा टाकून, पिठा ओलांडून सहीसलामत पसार झालों!

"पण हें असें रोजच साधेल, अशी खात्री नव्हती. म्हणून मी दुसरे दिवशीं आजारी पडलों! आणि तिसरे दिवशीं घरून आई आजारी असल्याचें पत्र आल्याचा बहाणा करून कोंकणांत पसार झालों!

"एकदोन महिने मी असा पडून राहिलों, तों काळ पालटला आहे असें मला दिसून आलें. कायदेभंगाला देश तयार नाहीं, खादीनें स्वराज्य मिळणार नाहीं, अशी घोषणा सुरू झाली आणि कोशांतून बाहेर पडण्याला ही संधि ठीक आहे. असें पाहून मीही फलपांखरासारखा एकदम बाहेर

पडलों. सुरवंट, आणि त्याचेंच बनलेलें फूलपांखरूं यांत जसें कांहींच साम्य नसतें, तशीच आतां माझी स्थिति झाली.

" खादीवांचून तरणोपाय नाहीं " हें माझें ब्रीदवाक्य बदलून 'खादीनें स्वराज्य मिळणार नाही' हें आतां माझें ब्रीदवाक्य झालें! काळ बदलला होता. एकेक वकील आपल्या झिळमिळ्यांच्या पगड्या सरसावीत परत घरट्यांतून बाहेर डोकावूं लागत होते. मीं ती संधि साधली. वांद्र्याचे सुप्रसिद्ध वकील श्री० लफंगे यांस मुद्दाम बोलावून त्यांच्या अध्यक्षतेखाली, त्याच गांवांत आणि त्याच खादीच्या पोशाखांत मी 'खादीनें स्वराज्य मिळणार नाहीं' या विषयावर स्फूर्तिदायक व्याख्यान दिलें! कांही कर्मचांडाळ लोक माझी चेष्टा करूं लागले आणि भाषण करितांना, तपकिरीची चिमूट नाकांत कोंबीत, मीं जेव्हां



'खादीनें स्वराज्य मिळणार नाहीं' असें ठांसून सांगितलें, तेव्हां समोरच्याच एका शिरोमणीनें मला 'मग काय तपकीर ओढून मिळेल?' असें बेधडक विचारलें!

" झालेल्या प्रकारानें मी जरी डगमगलों नाही, तरी एवढा मात्र मनाशीं निश्चय केला, कीं आतां या गावांत राहून आपली पुढारीपणाची शोभा

राहणार नाहीं; आणि लगेच मीं माटुंग्यास खोली पाहून या चाळींत येऊन राहूं लागलों. असहकारितेच्या सांपळ्यांतून बाहेर पडल्यावर स्वराज्य पार्टीत शिरण्याचा माझा पहिला बेत होता. पण या पक्षांत सुद्धां पुढारी म्हणून रहायचें असेल, तर आपण वकील, एखाद्या वर्तमानपत्राचा संपादक असें कांहींतरी असलें पाहिजे. आमदार किंवा खासदार होणें शक्य असल्यास फारच उत्तम ! पण मला या गोष्टींपैकीं कुठलीच गोष्ट साध्य होणारी नव्हती. म्हणून येथें आल्यावर मीं अगदी नवीन दिशेनें चळवळीस आरंभ केला. मीं समाजसेवा करण्याचें ठरविलें. अलीकडच्या मुलांत पितृभक्ति दिसून येत नाहीं, असें निदान ठरवून, वर्षांतून एक 'पितृदिन' साजरा करावा, अशी प्रचंड चळवळ मी आरंभिली ! "

" अन् तूं तर आपल्या बापाला एकही दिवस सुख दिलें नाहींस !! "

" हॅं:, हॅं: ! अरे, हें असें चालायचेंच. तें कशाला ? मी स्त्रीदास्यविमोचनसंघाचा अ० सेक्रेटरी आहें ना ? पण परवांच मीं आमच्या हिला कशावरूनशी पोत्यांतल्या कोळशांनीं सडकली ! हॅं:, हॅं: ! अरे, हें चालायचेंच ! बरें, मी काय सांगत होतों ? हां. मीं पितृदिनाची चळवळ आरंभिली. शाळांना त्यानिमित्त सुटी द्यावी असें एक माझें मुख्य कलम असल्यामुळें विद्यार्थी व शिक्षक यांचा मला जोराचा पाठिंबा मिळाला ! झालेंच तर येथील होलिकासंमेलन कमिटी जवळ जवळ विझली होती, ती मीं पुन्हा पेटविली ! म्हणजे श्रीयुत सोराबजीशेठ बटरवाला, जे. पी. यांचे अध्यक्षतेखालीं तिचें पुनरुज्जीवन केलें. झालेंच तर शिशुसप्ताहाचे ब्रँचमध्यें ऑ. सेक्रेटरीचें काम पत्करलें. एक दिवस माटुंगासमाचाराच्या उपसंपादकाच्या समाचाराला गेलों असतां तो आजारी पडून गांवीं चालल्याचें आढळून आलें तेव्हां त्याची ॲक्टिंग जागा मीच भरून टाकली. आणि हल्लीं मी तें पत्र माझ्याच महत्त्वाच्या ( ? ) व्याख्यानांनीं बहुतेक भरून काढीत असतों ! शिवाय मी कित्येक संस्था नवीन..."

" पुरे पुरे बाबा ! या काय संस्था कीं काय ? किती या संस्था ? "

" ह्या संस्था लोकांना खुपत नाहींत, आणि सरकारला बोंचत नाहींत !..."

" पण त्यांच्या कार्यापासून येथल्या लो..."

" हो, हो ! येथल्या लोकांचें पुष्कळ कल्याण होण्याचा संभव आहे. पण इतक्या खोलांत विनाकारण कशाला शिरतोस ? " दिगूभाऊ त्रासून म्हणाले.

" स्त्रीदास्यविमोचनसंघानें किती स्त्रियांचें दास्य विलयाला गेलें ? "

दिगू नुसता हंसला !

" पितृदिनाचे चळवळीनें किती मुलें पितृभक्त निघालीं ? "

" तें सांगतां येणार नाहीं ! " दिगू डोकें खाजवीत म्हणाला.

" मग रे ह्या कसल्या संस्था ? "

" वाः ! काम दिसलें नाहीं, म्हणून संस्था नाहींत, असें कसें म्हणून चालेल ? संस्था आहेत, त्यांच्या नांवांचे बोर्ड आहेत, अध्यक्ष आहेत, चिटणीस आहेत, फंड आहेत,—सगळें कांहीं आहे ! आणि रिपोर्टेही प्रसिद्ध होतात ! यंदांच या सर्व संस्थांचा मिळून मी एक त्रैवार्षिक रिपोर्ट छापून प्रसिद्ध करणार आहें ! कां ? "

" फार उत्तम ! " मी हंसत म्हणालों. आतां पुढें काय सांगूं ? देशभक्त आणि पुढारी यांबद्दल माझें पहिलं मत आणि आतांचें मत यांची तुलना करण्याचे भरीस मी आतां पडत नाहीं. आणि दिगूचे खोलीवरची लांबलचक पाटी वाचून उत्पन्न झालेले विचार, आणि आतांची मनःस्थिति यांची तुलनाही वाचण्याची तसदी मी तुम्हांला देत नाहीं !

---

# धर्मवीर लुडबुडे यांचा देशोद्धारक मेळा.

दिगूभाऊ पुढारी कसे बनले ती आश्चर्यजनक हकीगत मी वाचकांच्या कानावर घातलीच आहे. त्यानंतर त्यांच्या ( व माझ्याही ) चरित्रांत ज्या विशेष गोष्टी घडल्या, त्यांची माहिती वाचकांना असण्याचा तादृश संभव नाहीं. म्हणून होतकरू पुढाऱ्यांच्या उपयोगासाठीं पुढील थोडीशी हकीगत येथें देत आहें.

तुम्हांला हें माहीतच आहे, कीं मला वर्तमानपत्रें वाचण्याचा बराच नाद आहे. तेव्हां एके दिवशीं ठाणें समाचाराचा एक अंक माझे दृष्टीस पडल्याबरोबर मी तो सहज चाळून पाहत असतां ' धर्मवीर दिगूभाऊ लुडबुडे ' असा एक जाडया टाइपांतला मथळा माझ्या दृष्टीस पडला ! आणि ' धर्मवीर लुडबुडे यांचा देशोद्धारक मेळा ' या नांवाची एक भली मोठी जाहिरातही त्याच वर्तमानपत्राच्या मुखपृष्ठावर झळकत असलेली मी पाहिली ! तेव्हां आश्चर्यानें थक्क होऊन गेलों ! हा आमचाच दिगू, की दुसरा कोणी आहे, हें पडताळून पाहण्याकरितां त्या मथळ्याखालील मजकूर मी अधाशासारखा भराभर वाचून काढला आणि त्याबरोबर माझी खात्री झाली, कीं हा धर्मवीर म्हणजे आपला दिगूच !

धर्मवीर म्हणजे काय, आणि आमचा दिगू धर्मवीर कधी झाला, तसेंच देशोद्धारक मेळा म्हणजे काय आणि तो दिगूनें कधी काढला, हे प्रश्न माझ्या डोक्यांत एक सारख घोळूं लागले. गेल्या वर्षी मी त्याला भेटलों होतों, तेव्हां तो पुढारी कसा झाला, तें कच्चें वर्तमान त्याचे तोंडून मला कळलें होतें. पण आज बघतों, तों तोच दिगू आपला धर्मवीर बनला ! तेव्हां या गोष्टीचें मला आश्चर्य वाटल्यावांचून कसें राहील ? पण नुसतें आश्चर्यच न वाटतां मला त्याचें कौतुकही वाटलें. आणि खरें सांगायचें, म्हणजे त्या क्षणापासून माझ्याही डोक्यांत महत्वाकांक्षेनें प्रवेश केला ! मला आपलें असें वाटायला

लागल, कीं दिगूभाऊ जर पुढारी बनला, तर माझ्यासारख्या मनुष्याला त्याच्या तालमेंत राहून प्रसिद्ध पुरुष कां बनतां येणार नाहीं ? मी तरी कुठें कमी आहें ? मी सुद्धां झांकलें माणीक नसेन कशावरून ? शिवाय दिगूचा कित्ता डोळ्यांसमोर असला, आणि त्याच्याच सल्ल्यानें चार पवित्रे टाकले, म्हणजे तर ही गोष्ट फार सोपी आहे.

आणि विशेषकरून सांगायची गोष्ट म्हणजे हा विचार मी लगेच अमलांत आणण्याचेंही ठरविलें ! मनुष्याच्या मनांत पुष्कळ विचार येतात आणि जातात. पण मनुष्य आपला प्रत्येक विचार कृतींत आणण्याच्या भानगडींत पडत नाहीं. आणि मला वाटतें, त्यामुळेंच मानवी सृष्टींतले पुष्कळसे अनर्थ टळतात ! तें कांहीं असो. पण मी मात्र माझी ती महात्वाकांक्षा मनांतच मारून न टाकतां, लगेच एक बरासा मुहूर्त पाहून दिगूभाऊचे गांवाचा रस्ता सुधारला. दिगूभाऊ रहात होता तें गांव मुंबईपासून कांहीं फार दूर नव्हतें. आणि त्याचा पत्ता हुडकायलाही मला फारसे आयास पडले नाहींत. मी त्याच्या दाराशीं जाऊन उभा राहिलों आणि आंत डोकावून पाहिलें, तों तो कांहींतरी लिहिण्यांत गुंतला आहे असें दिसलें. त्याच्या लिहिण्यांत व्यत्यय येऊं नये या विचारानें आणि मागचा अनुभव अजून मी विसरलों नसल्यामुळें त्याला हांक वगैरे मारण्याच्या भरीस न पडतां मी त्या किलकिल्या दारांतून हळूच आंत प्रवेश केला आणि निमूटपणें त्याच्या समोर उभा राहिलों.

मी उभा राहिलों, तरी तो आपला लिहीतच होता. त्याचें तें अक्षर निदान त्याला तरी समजत होतें कीं नाहीं कोण जाणे ! पण कित्येक थोर पुरुषांचीं अक्षरें वाईट असल्याचें मी वाचलें होतें, त्याचें मला स्मरण झालें. आणि आमच्या दिगूनें कागदावर केलेली ती गिचमीड पाहून माझ्या मनांतला त्याच्या विषयींचा आदर कमी न होतां उलट दुणावला !

मी बराच वेळ उभा राहिलों, तरी दिगूचें लक्ष माझेकडे जाण्याचें लक्षण दिसेना. तेव्हां मी बळेंच थोडेंसें खोकल्यासारखें केलें. त्याबरोबर

दिगूनें आपल्या चष्म्याच्या बचकेएवढ्या गोल भिंगांतून माझ्याकडे पाहिलें आणि एकदम " ओहो ! कोण बंडू ? अरे वा ! लेका बहार केलीस की ! " असे उद्गार काढले.

" खरी बहार तूं केली आहेस बाबा ! " मी खालीं टेंकतां टेंकतां हळूच हंसत म्हणालों. आणि खरें पुसाल, तर दिगूनें माझें जेव्हां असें हंसत आणि प्रेमानें स्वागत केलें, तेव्हां मला अगदीं मनापासून आनंद झाला. कारण दिगू इतक्या सलगीनें माझ्याशीं वागेल कीं नाहीं याची मला अमळ शंकाच होती.

" काय म्हणतोस ? मी बहार केली ? " दिगू आपला चष्मा काढून हातांत घेत आणि आपल्या तंगड्या टेबलावर फेंकीत म्हणाला.

" नाहीं तर काय ? दिगू, मी चेष्टेनें नाहीं म्हणत, पण खरोखर तूं मोठाच लौकीक संपादन केला आहेस. तुझी ही धडाडी आणि तुझ्या या नित्य नव्या चळवळी पाहून खरोखर तुझी तारीफ करावी तेवढी थोडीच असें वाटूं लागतें. पण तें राहूंदे. आधीं तुझें तें लिहिणें पुरे कर. मग आपण स्वस्थपणें बोलूं. मला या खेपेला तुला पुष्कळ गोष्टी विचारायच्या आहेत. " मी जेठा मारून आणि आपली चंची सोडून दिगूला म्हणालों.

" अरे संपलें माझें लिहिणें. त्याची एवढी घांदल आहे असें नाहीं. हीं लिहिणीं आणि हीं भाषणें आतां आमच्यामागें जन्माचींच लागलेलीं आहेत. त्यांतल्या त्यांत या शुद्धीच्या चळवळींत तर फारच बेफाट भाषणें करावीं लागतात ! ही माझ्या आवाजाची दशा तूं पाहतो आहेस ना ? "

" होय ! तुझा आवाज म्हटलें म्हणजे चांगला पहाडी. पण तो आज अगदींच फुकट गेलेला दिसतो आहे. " मी लगेच दिगूला म्हटलें आणि मी म्हटलें तें उगाच तोंडदेखलें म्हटलें असें नाहीं. कारण दिगूचा आवाज खरोखरच पार बसून गेला होता. मंत्रपुष्पाचे वेळीं—देवे म्हणतांना—चढाओढीनें भयाकारी ओरडून जसे आमचे आवाज कांहीं दिवस पार फुकट जातात, त्यांतलाच प्रकार यावेळीं दिगूचा झाला होता !

“ अरे पहाडी आवाजाला काय करतोस ? पण कसलाही आवाज या शुद्धिसंगठनांत [illegible]नाबूद होऊन जाईल ! तूं माझें शुद्धीवरचें एखादें व्याख्यान ऐ[illegible]......”

“ तुझें कुठलें, पण कोणाचेंच शुद्धीवरलें व्याख्यान मी अजून ऐकलें नाहीं. त्या भिकार कोंकणांत कुठली शुद्धि आणि कसलें संगठन ! ” मी एक निराशेचा सुस्कारा टाकून मध्येंच म्हणालों.

“ ए: ! त्यांत काय आहे ? कोंकणांतसुद्धां शुद्धीची गडबड उडवून देतां येईल. पण तसा खमक्या पुढारी पाहिजे ! सध्या मी राहतों आहें या गांवांत तरी कोठें होती ही चळवळ ? पण मी येथें आल्यापासून नुसती आग लावून दिली आहे ! ” दिगू विजयी मुद्रेनें म्हणाला. आणि मीही लगेच त्याचें याबद्दल अभिनंदन करून टाकणार होतों. पण आमचें भाषण परत मूळ मुद्यावर यावें, म्हणून त्या भानगडींत सध्या न पडता मी दिगूला म्हणालों—

“ तें खरें. पण केवळ शुद्धीवर व्याख्यानें देऊनच का तुझ्या आवाजाचें असें हें मडकें झालें ? त्या व्याख्यानांतून एवढ्या मोठ्यानें ओरडावें लागतें ?”

“ अजून बच्चा आहेस तूं ! ” दिगू किंचित् हंसून म्हणाला. “ अरे, या शुद्धीवरच्या व्याख्यानांत पुढाऱ्याला बेशुद्ध पडेपर्यंत ओरडावें लागतें ! त्याशिवाय लोक शुद्धीवर येत नाहींत ! घसा फुटेल या धास्तीनें ओरडण्यांत जरा का कुचराई केली, कीं तो पुढारी तेवढ्या प्रमाणांत खालीं आलाच म्हणून समजावें ! ”

“ म्हणजे ? ” मी आश्चर्यानें म्हणालों, “ वक्त्यानें आपलें उगाच ओरडत सुटायचें ? ”

“ उगाच कसें ओरडायचें ? शुद्धीच्या नांवानें ओरडायचें ! उगाच ओरडून लोक बरे ऐकतील ? अरे, शुद्धीचीं भाषणें हीं वीरश्रीचीं भाषणें असतात. ‘ हिंदुपद पातशाही, ’ ‘ शिवाजी महाराज, ’ ‘ गनिमी कावा, ’ ‘हुतात्मा’ असले शब्द मधून मधून आपल्या भाषणांत आणून ते ठासून उच्चारले पाहिजेत !....”

"हुतात्मा म्हणजे रे काय ?" मी मध्येंच विचारलें. त्याबरोबर दिगू उसळून म्हणाला—

" तुमचें चुकतें तें इथेंच ! म्हणे हुतात्मा म्हणजे काय ! कांहीं का असेना ? त्याच्याशीं आपल्याला काय करायचें आहे ? शुद्धीच्या व्याख्यानांत हुतात्मा हा शब्द वारंवार आला पाहिजे, ही खूणगांठ लक्षांत ठेवली म्हणजे संपलें आपलें काम ! पण मी हें तुला भलतेंच काय सांगत बसलों ! ..." दिगू मध्येंच जीभ चावून म्हणाला.

पण तो असा मध्येंच एकाएकीं थांबल्यामुळें माझा मात्र अतिशय विरस झाला ! तो ज्या भाषणाला ' भलतेंच ' म्हणून म्हणत होता, तें वास्तविक माझ्या दृष्टीनें अगदीं अतिशय महत्वाचें आणि मुद्याचें भाषण होतें. त्यामुळें तो असा एकाएकीं थांबतांच मी त्याला काकुळतीच्या स्वरानें म्हणालों—" दिगू, हें तुझें भाषण भलतेंच नाहीं. आणि मलाही तूं भलताच मनुष्य समजूं नको ! वेळ आली आहे, तेव्हां मीही तुला स्पष्टपणें आतांच सांगून टाकतों, कीं मी जो आज येथें आलों आहें, तो चार दिवस रहाण्याकरितां आलेला नसून तुझ्या हाताखालीं तयार होण्याच्या उद्देशानें येथें कायम रहाण्या करितां आलों आहें ! तुझ्या या नित्य नव्या चळवळी, त्या चालविण्याची तुझी हातोटी, तुझे दणदणीत लेख, आणि तुझी पुढारीपणा चालविण्याची ही लकब हीं पाहून खरोखर मला एकदम स्फूर्ति होऊन, मी कोंकणचा किनारा सोडून आज तुझ्या दाराशीं आलों आहें. मी तुझ्या तोलाचा पुढारी होईन, असें म्हणण्याचें धाडस मी करीत नाहीं, पण तुझ्या तालमेंत राहून आपणही आपलें थोडें फार नांव करावें अशा उमेदीनें मी तुझेकडे आलों आहें. तेव्हां तूं मनमोकळेपणानें माझ्याशीं बोललास तर तें अनाठायीं........."

" छे छे ! तसें मला मुळींच वाटत नाहीं. अरे तुझी माझी ओळख काय आजकालची आहे ?" दिगू प्रेमानें म्हणाला. "मला तसें वाटत असतें, तर मागें तूं आला होतास तेव्हां तुझ्याशीं मी तसें मोकळ्या मनानें बोललों

असतों का ? पण बंडू, तूं माझ्याजवळ राहण्याचा जो हा बेत केला आहेस, तो पुरा विचार करून केला आहेस ना ?"

"हो हो !" मी आनंदानें म्हणालों. "पुरा विचार केला आहे. पण तूं असें कां विचारतोस ?"

"कां विचारतों म्हणजे ? अरे, या चळवळींत पडायचें, म्हणजे बाबा अतिशय खस्ता खाव्या लागतात. हजार प्रकारचे डावपेंच लढवावे लागतात. या बोटावरची थुंकी त्या बोटावर हरदम करावी लागते आणि सर्वांत मुख्य गोष्ट म्हणजे पक्कें निगरगट्ट बनावें लागतें ?"

"कांहीं हरकत नाहीं !" मी तत्काळ म्हणालों. "एकदां सराव झाला, म्हणजे या सगळया गोष्टी मी बेमालूम करूं लागेन ! शिवाय तुझा कित्ता माझ्यापुढें आहेच ना ? मला काय एकदम आजच पुढारी बनायचें नाहीं."

"शाबास !" दिगू संतोषानें म्हणाला. "हें मात्र तूं लाखाचें बोललास. तुला मोठा माणूस होण्याची थांदुल नाहीं, हें सर्वांत चांगलें लक्षण आहे ! आतां तूर्त ही गोष्ट लक्षांत ठेव,......"

"दिगूभाऊ" दिगूचें तें महत्वाचें बोलणें पुरें होण्याच्या आधींच एक गोरागोमटा पोरगा मध्येंच धांवत येऊन दिगूला म्हणाला. "दिगूभाऊ, गोप्या कबूल होत नाहीं. तो म्हणतो, लुगडें नेसायला मला लाज वाटते !"

"गाढवच आहे लेकाचा !" दिगू म्हणाला. "अरे देशाकरितां लुगडें नेसण्यांत लाज कसली ? कां ? खरें आहे कीं नाहीं बंडू ?"

"अं. . अं. . हो हो ! खरेंच आहे तें !" मी चटकन् म्हणालों ! पण खरोखर दिगू काय म्हणाला, आणि देशाकरितां लुगडें कशाला नेसायला पाहिजे, त्याचा मला मुळींच पत्ता लागला नव्हता ! पण दिगूच्या देशोद्धारक मेळ्या-संबंधीं हें कांहीं तरी लचांड असावें एवढा मात्र मी कयास बांधला. आणि दिगूला म्हणालों— "हा गोप्या कोण ! आणि तो लुगडें कां नेसत नाहीं ?"

"अरे वेडें पोर म्हणून !" दिगू हंसत म्हणाला. "बाकी पोरगं असें

मारू आहे म्हणतोस, कीं ज्याचें नांव तें! गुलामाला स्त्रीपार्ट दिला, कीं लोकांना नुसतें वेड लावील!"

"कोणाचा मुलगा आहे?"

"अरे ती पार्वतीबाई आहे ना! बिचारी दळणकांडण करून कसाबसा गुजारा करते; तिचा हा मुलगा. पोरगं गोंडस आहे, आणि हुशारसें दिसलें, म्हणून आमच्या देशोद्धारक मेळ्यांत त्याला घेतला आहे. सारें भाषणही पाठ झालें आहे. ॲक्टिंगसुद्धां फर्स्टक्लास करतो! पण आतां आज रंगाची तालीम आहे, तर बेटा लुगडें नेसायला लाजतो आहे! तोच हा आमचा छब्या पहा. याला लुगडें नेसायची उलट घाई झाली आहे!" त्या पोराच्या गोंडस गालाचा हळूच गालगुच्चा घेत दिगू म्हणाला!

"तुझ्या मेळयांत मुली नाहींत वाटतें?" मी विचारलें. कारण 'मुलांमुलींचा मेळा' अशा जाहिराती मी वर्तमानपत्रांतून अनेकवेळां वाचल्या होत्या.

"मुली नाहींत, म्हणून तर सारी अडचण." दिगू एक सुस्कारा टाकून म्हणाला. "अरे, हीं मुलेंच गटवायला मला कोण प्रयास पडले! मुली मिळविण्याच्यासुद्धां मी खटपटींत आहें. एकदोन दिखाऊ पोरी जर माझ्या मेळयाला मिळतील, तर मी हल्लींच्या चौपट पैसे मिळवीन! अशा पोरी गांवांत नाहींत असें नाहीं. पण आमच्या लोकांना देशाची तेवढी चाडच नाहीं!!"

दिगूचें बोलणें ऐकून मला सगळेंच आश्चर्य वाटलें! कोंवळ्या कुमारिकांनीं मेळ्यांत पार्ट घेऊन नाचण्यांत देशाचा आणि देशभक्तीचा काय संबंध आहे तें मला कळेना. पण तसें एकदम विचारण्याची सोय नव्हती! शिवाय चार दिवस स्वस्थ बसून सगळया गोष्टी पहाव्या, म्हणजे बराचसा उलगडा आपोआप होईल असा विचार करून, मी तोंडाला खीळ घालून बसलों.

असो. रात्रीं जेवणें आटोपल्यावर देशोद्धारक मेळ्याचे एकेक मेंबर दिगूकडे जमूं लागले. पेटीवाला आला, आणि कोंपऱ्यांतली पेटी उघडून ती

वाजवून पाहूं लागला. नंतर तबलजी आला, पोरांना रंगविण्याचें काम करणारा आला, कवि आले, नाटककार आले, संपादक आले, आणि मोंडस चेहऱ्याच्या पोरांचा तांडाही येऊन दाखल झाला.

प्रथम मेळ्याकरितां तयार केलेलीं संगीत पदें त्या मुलांकडून तबल्याच्या ठेक्यांत आणि ठसकेदार आवाजांत म्हणवून घेतलीं. पदें म्हणतांना हावभाव करण्याचें शिक्षण कवि श्री. काव्यजंगल हे दिगूभाऊंचे मदतीनें देत होते. तीं पोरें आपल्या जिवाचें रान करीत तसे हावभाव उठविण्याचा प्रयत्न करीत होतीं. तरी पण काव्यजंगलांचें समाधान न होतां ते तितक्या वेळां नाक मुरडून 'पुन्हा' 'पुन्हा' असे हुकूम त्यांना फरमावीत होते! अशा रीतीनें पदांची सक्त तालीम दोन अडीच तास झाल्यावर, नंतर 'बाजीराव मस्तानी' ह्या मेळ्याकरितां मुद्दाम बनविलेल्या फार्साकरितां मुलें रंगाविण्याची तयारी सुरू झाली. या नाटकांत त्या गोप्याला मस्तानीचें काम होतें. पण तो स्त्रीवेष घेण्याला तयार होईना! तेव्हां त्याच्याभोंवतीं ते सारे मेळेवाले देशभक्त जमा झाले आणि प्रत्येकजण त्याची खरडपट्टी काढूं लागला. त्याच्या अंगावर प्रथम काव्यजंगल ओरडले. मग नाटककारांनीं त्याची हजेरी घेतली. "तुला गांवांत कोणी मधुकरीसुद्धां वाढणार नाहीं, असा बंदोबस्त करून टाकूं" अशीही सज्जड धमकी त्या कोंवळ्या पोराला देण्याचें त्या देशभक्तांनीं—त्या शिवाजीच्या वंशजांनीं—कमी केलें नाहीं! शेवटीं एका पांचट वर्तमानपत्राचे एक फाटके संपादक आपली बात्तिशी बाहेर काढीत म्हणाले—"अरे बावळ्या, ही कांहीं नाटक कंपनी नाहीं तुला एवढें बिचकायला! हा बोलून चालून मेळा! आणि तोसुद्धां देशोद्धारक! लेका! देशाकरितां तुम्ही नुसतें लुगडेंसुद्धां नेसायला तयार नाहीं. मग तुम्ही पराक्रम काय करणार तें दिसतेंच आहे! हीं अलीकडचीं पोरेंच कमकुवत. मला कुणी आजसुद्धां सांगूं दे लुगडें नेसायला..."

"हां हां! विसूभाऊ, तेवढी मात्र मेहेरबानी करा!" दिगू संपादक महाशयांना हात जोडून म्हणाला! "आपण लुगडें नेसून आमच्या मेळ्यांत



" अरे, तूं हें मस्तानीचे काम
फक्कड उडवून दे, कीं बघ तुझ्या-
वर उद्यां अग्रलेख ठोकतों ! "





नाचलां, कीं आमचे बारा वाजलेच पाहिजेत ! तेव्हां आपण तेवढी तसदी घेतली नाहीं, तर आपले फार उपकार होतील !"

त्यावर संपादक विसूभाऊंनीं पुन्हा एकदां प्रचंड हास्य केलें. आणि तें करीत असतांना दिगूभाऊंचे खिशांतील सिगारेट काढून, आणि ती पेटी-वाल्याचे हातांतील आगपेटीनें पेटवून, आपल्या तोफखान्यांतून धुराचे प्रचंड लोट काढण्यास त्यांनीं सुरवात केली !

बिचारा गोप्या ! तब्बल दोन अडीच तास पदें ठांसून म्हणतांना तो घामानें नुसता निथळत होता. त्यांत त्याच्यावर त्या साऱ्या देशभक्तांनीं जो चोहोंकडून एकदम गहजब उडवून दिला, त्यामुळें त्या कोंवळ्या आणि नाजूक प्रकृतीच्या पोरावर फारच परिणाम घडला होता. त्याचें तोंड गोरेंमोरें होऊन त्याच्या डोळ्यांत अश्रूही उभे राहिले होते. तरी अशाही स्थितींत दिगूभाऊ त्याची बकोटी धरून त्याला स्त्रीवेष देतच होते ! काय ही देशासाठीं धडपड !

"हें बघ गोप्या," त्याच्या गोंडस हनुवटीला हात लावून त्याचें तोंड बळेंच वर करण्याचा अट्टाहास करीत विसूभाऊ म्हणाले. "अरे, तूं हें मस्तानीचें काम फक्कड उडवून दे, कीं बघ तुझ्यावर उद्यां अग्रलेख ठोकतों ! तुझा मस्तानीच्या वेषांतला खुबसुरत फोटो छापतों. आणि वर "महाराष्ट्राचा बुलबुल" असें बचके एवढ्या अक्षरांत नांव देतों ! अरे मोठमोठे आमदार आणि खासदार सुद्धां तुला मिळालेली प्रसिद्धी पाहून लाळ घोंटतील !"

झालें ! शेवटीं एकदांची गोप्याची मस्तानी बनली आणि नाटकाच्या तालमेला सुरवात झाली. केवळ स्त्रियांना योग्य अशा अंगविक्षेपांसह चालीं-वरचीं पदें ठसक्यांत म्हणतांना बिचारें तें पोर अगदीं उरीं फुटण्याच्या बेतांत आलें होतें. आणि इकडे बाजीरावाचा पार्ट घेतलेल्या मुलाचा घसा, वीरश्रीचीं लांबलचक भाषणें खड्या सुरांत पुन्हा पुन्हा म्हणतांना पिंज-ण्याच्या बेतांत आला होता ! अशा रीतीनें सुमारें एक दीड वाजतांना ती तालीम संपली. नंतर दिगूभाऊनें तितक्या रात्रीं बायकोला चहा आणि

चिवडा बनविण्यास फर्मावलें आणि सर्व पोरांसह त्याच्यावर ताव मारून ती सारी मंडळी घरोघर चालती झाली.

नंतर सर्व सामसूम झाल्यावर दिगू बाहेर आला आणि एका मोडक्या बांकावर विडी फुंकीत बसला. झोंपेची वेळ टळून गेल्यामुळें मीही बाहेर त्याच्याच शेजारीं जाऊन टेंकलों.

" पाहिलेंस ? अशा वेळीं खर्चाकडे पाहून चालत नाहीं ! या चहा चिवड्याला आणि सिगारेटना काय थोडा खर्च लागतो ? पण तो केल्या-वांचून भागत नाहीं. हीं पोरं खूष ठेवलींच पाहिजेत. आणि हे कवि, संपादक वगैरे भुतांना पण खूष ठेवावीं लागतात ! बाबा, धंदा म्हटला म्हणजे हें असेंच आहे !" दिगू म्हणाला.

" पण कायरे दिगू, लो. टिळकांनीं मेळे काढले, तेव्हां त्यांत अशीं नाटकें नसत ! "

" नसत !"

" आणि ते मेळे फक्त गणेशोत्सवापुरतेच असत नव्हे का ? "

" नाहीं कोण म्हणतो ?"

" मग आतांच हें असें कसें ? हल्लींचे मेळे पाहातों, तों ते आपले चक-चकीत नाटकच करितात ! त्यांत कुलीन लोकांच्या खुबसुरत पोरीही सोंगें घेतात; या मेळ्यांचीं नाटकें दिवे लावून चक्क थेटरांतून होतात. तिकीट लावून पैसे घेतात...!"

" हो ! मग ?"

" आणि गांवोगांव हिंडून बाराही महिने हा धंदा चालतो !"

" हो चालतो ! मग त्यांत तुला एवढें आश्चर्य काय वाटलें ?" दिगू ओरडून म्हणाला.

" टिळकांनीं काढलेले मेळे असे नव्हते..."

" नसतील !" दिगू हंसून माझा उपहास करीत म्हणाला. " अरे, नदी उगमाजवळ किती बारीक असते ? पण पुढें पुढें तिचें पात्र किती रुंद

होत जातें ! तसेंच हें आहे. टिळकांनीं काढलेली ही मेळ्यांची उपयुक्त चळवळ परिणत होऊन आतां इतक्या उत्कर्षाला चढली आहे ! लोकमान्यांनीं मेळयाचें नुसतें रोप लावलें. पण आम्ही त्याला आपल्या बुद्धीचें खतपाणी घालून त्याचा हा एवढा वटवृक्ष तयार केला ! त्यावेळीं मेळा ही खर्चाची बाब असली, तर आज ती उत्पन्नाची बाब होऊन बसली आहे ! अरे, अनुयायी कर्तबगार असले, म्हणजे पुढाऱ्याच्या उद्योगांचें कसें चीज होतें, त्याचा आमचे हे मेळे हा एक उत्कृष्ट मासला आहे ! "

दिगूचें हें भाषण ऐकून मी आश्चर्यानें अगदीं थक्क होऊन गेलों ! मी जागा आहें कीं मी हें झोंपेंत कांहीं तरी ऐकतों आहें, याचाच मला उलगडा होईना, आणि क्षणभर माझा मेंदू अगदीं सुन्न होऊन गेला. पण जिज्ञासेच्या तावडींत सांपडून मी आणखी माहिती मिळविण्याच्या मोहानें दिगूस विचारलें–" दिगू, तूं रागावणार नसलास, तर आणखी थोडें विचारणार आहें......"

" खुशाल विचार ! अरे, आपलीं हीं खासगी बोलणीं. शिवाय तूं माझा विश्वांसातला मदतगार. तेव्हां तुझ्याशीं रे कसला आला आहे आडपडदा ? "

" मी म्हणतों, कीं नाटक कंपनी आणि हा तुझा मेळा यांत फरक तरी काय ? "

" वेड्या फरक कसला आला आहे ? ते पैसे मिळवितात, आणि आम्हीही पैसे मिळवितों......"

" मग तुम्ही मेळा असें कां नांव देतां ? चक्क..."

" मूर्ख आहेस अगदीं ! अरे, त्यांतच सगळें रहस्य आहे ! आम्ही जर आमच्या धंद्याला नाटककंपनी म्हटलें, तर आम्हांला मग देशभक्त कोण म्हणेल ? आणि धर्मवीर तरी कोण म्हणेल ? गांवोगांव आम्हांला मेजवान्या झडतात आणि फुकट चहा चिवड्याची सोय होते, ती मग कशी होणार ? आणि चुणचुणीत मुलें आणि पोरी केवळ जेवणावारी कशा मिळणार ? "

"मग धर्मवीर तरी कशाला झालास? तुला जर या धंद्यांत पडायचें होतें, तर..."

"अरे धर्मवीर झालों म्हणजे काय? ती तरी एक गंमतच आहे! मौलाना अजगर अल्ली यानें तंझीम चळवळीवर भाषणें सुरू केलीं, तेव्हां शुद्धीवर मीही एक व्याख्यान शिलगावलें! नाहीं तरी त्यावेळीं मी रिकामाच होतों. पण आमच्या विसूभाऊंनीं आपल्या वर्तमानपत्रांत एकदम धर्मवीर ही पदवी मला चिकटवून दिली! बाकी त्यांत माझें कांहीं नुकसान झालें नाहीं म्हणा. कांहीं झालाच, तर अप्रत्यक्ष फायदाच झाला आणि होईलही! पण त्यामुळें माझा प्रत्यक्ष असा आर्थिक फायदा कांहीं विशेष झाला नाहीं. अरे अजगरअल्लीला पूर्वी वेळीं चणेसुद्धां फांकायला मिळत नव्हते! आणि त्याचें धर्मज्ञानही तसेंच अगाध आहे! पण हें तंझीमचें खूळ त्याच्या चांगलेंच पथ्यावर पडलें आहे! तात्पर्य सांगायचें एवढेंच, कीं माझ्या धर्मवीर या पदवीचा हा असा इतिहास आहे. विसूभाऊनें फुकटची पदवी दिली आणि तुझ्यासारख्यांनीं वाचली. पण त्यानें माझें थोडेंच पोट भरणार आहे?"

बोलतां बोलतां दिगूचा स्वर बराच वर चढलेला दिसला. तेव्हां हा विषय आतां आटपता घ्यावा असें ठरवून मी दुसरा विषय काढला आणि झोंपेचें मिष करून अंथरुणावरही लवंडलों. पण खरें पुसाल, तर उरलेल्या रात्रींत माझा डोळ्याला डोळाही लागला नाहीं!

असो. अशा रीतीनें माझा कार्यक्रम चालला होता. दिगूकडे काय चाललें तें पहायचें आणि तो काय सांगेल तें काम करायचें, हाच माझा नित्यक्रम होता. पुढें बाजीराव—मस्तानीचें नाटक दिगूचे मनासारखें बसल्यावर त्याचा देशोद्धारक मेळा देशाचा उद्धार करण्याकरितां दौऱ्यावर निघाला. भुरट्या वर्तमानपत्रांतून या मेळ्याच्या हालचालींची अगदीं खडानखडा वर्णनें येऊं लागलीं! गोंव्याला मध्यें दोन दिवस पडसें आलें, ही बातमीसुद्धा विसूभाऊ संपादकांनीं अगदीं रंगवून आपल्या वर्तमानपत्रांत प्रमुख जागीं दिली! आणि त्यामुळें ठिकठिकाणच्या रसिक प्रेक्षकांचा

केवढा हिरमोड झाला आहे, याचेंही हृदयद्रावक वर्णन त्यांनीं केलें ! दिगू भाऊच्या मुलाखती प्रसिद्ध होऊं लागल्या ! आणि शेवटीं 'देशोद्धारक या नांवाचा एक खास अंक काढून विसूभाऊंनीं गोप्याचा मस्तानीच्या वेषांतला एक पानभर फोटो, पुरवणी म्हणून वांटला !

अशा रीतीनें सगळें ठाकठीक चाललें होतें, इतक्यांत मेळयाचा मुक्काम यवतमाळला असतांना आमच्या या कंपनीवर—नव्हे, चुकलों—मेळयावर एक मोठेंच गंडांतर आलें. म्हणजे ज्या दिवशीं मेळयाचा तब्बल चार तासांचा दणदणीत प्रोग्राम थिएटरांत लागला होता, त्याच दिवशीं रात्रीं गोप्याला सडकून ताप भरला. आणि छब्या, म्हणजे शिवाजीचें काम करणारा पोर, घरून तार आल्यामुळें त्याच दिवशीं पसार झाला होता ! छब्या गेला, तरी त्याचें शिवाजीचें काम स्वतःच करून दिगूनें मेळयाचा गाडा तसाच पुढें ढकलण्याचें ठरविलें होतें. पण गोप्याला असा एकाएकीं ताप भरल्यामुळें त्याचे हातपायच मोडून गेले ! मेळयासाठीं एक मुलगी मिळण्याचें साटें जवळजवळ ठरलें होतें. पण नग अजून ताब्यांत आला नव्हता. त्यामुळें त्या रात्रीं पुढें काय करावें ही विवंचना दिगूला पडली. तिकिटें तर केव्हांच पार खपून गेलीं होतीं ! त्यामुळें मेळयाचा कार्यक्रम आतां रद्द करणें अगदीं निखालस तोटयाचेंच होतें ! दिगू आंबट तोंड करून स्वस्थ उभा होता आणि मी खारट तोंड करून त्याच्याच समोर उभा होतों. इतक्यांत दिगूनें माझ्याकडे एक मिनिटभर निरखून पाहाल्यासारखें केलें आणि एकदम आनंदानें ओरडून तो म्हणाला—

" बंड्या, लेका टाळी दे टाळी ! युक्ती काढली शेवटीं ! "

मी चटकन हात पुढें करून त्या धर्मवीराची टाळी माझ्या हातावर झेलली ! आणि हाताला जरी चुणचुण सुटली होती, तरी खूप हंसरें तोंड करून दिगूच्या आनंदांत भागिदार झालों !

" अरे किती झालें, तरी या दिगूचें हें डोकें आहे ! "

" हो हो ! यांत काय संशय ? " मी दिगूच्या त्या प्रचंड डोक्याकडे नजर फेंकीत म्हटलें. "पण दिगू, युक्ती काय निघाली, ती तर सांगशील ?"

" हो हो ! अरे ती तुला सांगितल्याशिवाय भागणारच नाहीं ! पण लेका, तूं मात्र मनावर घेतलें पाहिजेस. "

" काय ? मी मनावर घेतलें पाहिजे ? " मी थोडेसें घाबरूनच विचारलें.

" हो हो ! तूंच मनावर घेतलें पाहिजेस. आज तुलाच मस्तानी बनवण्याचा माझा विचार आहे ! "

" काय म्हणतोस काय ? " मी आश्चर्यानें आणि भीतीनें हतबुद्धच झालों !

" होय होय ! तेंच म्हणतों. अरे प्रसंग येईल तसें वागलें पाहिजे. आपण बोलून चालून शिवाजीचे चेले !"

" मग ? शिवाजीनें काय मेळे काढले होते ? कीं नाटकांत बायकोचें सोंग घेतलें होतें ?"

" बायकोचें सोंग नसलें घेतलें म्हणून काय झालें ? तुम्हां लोकांचें चुकतें तें असच ! अरे त्याचा गनिमी कावा तेवढा आपण घ्यायचा ! प्रसंग पडला, तेव्हां शिवाजी पेटाऱ्यांत बसून पळाला होता कीं नाहीं ? आणि स्वतः बैराग्याचें सोंग घेऊन, बैराग्यांच्या मेळ्यांतून तो दक्षिणेंत आला होता कीं नाहीं ? वेड्या, तूं अजून राजकारणांत फारच कच्चा आहेस ! "

" असेन ! पण दिगू, मला बायकोचें सोंग घ्यायचें नाहीं. आणि मला तें जमायचें नाहीं ! "

" सगळें कांहीं होईल. तूं मनांत मात्र आणलें पाहिजेस ! तुझ्या परीक्षेची हीच वेळ आहे. आणि कर्तबगारीची तुला हीच संधि आहे. पहा. हिचा जर तूं फायदा घेतलास, तर माझेंही काम होईल आणि तुझेंही नांव वर्तमानपत्रांतून फडकेल ! मग काय ? "

" बरें आहे ! पण जरा विचार करायला मला फुरसुत तर देशील ? मी कांहीं तुझ्या बाहेर का आहें ? "

" शाबास शाबास ! " दिगू माझी पाठ थोपटून म्हणाला. " कांहीं तरी नांव काढशीलसें वाटतें. "

एवढें बोलून दिगू बाहेर गेला आणि मी माझ्यापुढें चालून आलेल्या संकटाचा विचार करायला मोकळा झालों. मी दिगूला तसें आश्वासन दिलें खरें. पण बायकोचा पार्ट घेण्याचें मी केव्हांही पत्करणें शक्य नव्हतें. मी कोंकणांतून जो येथें आलों, तो बायकोचं सोंग घेऊन मेळ्यांत नाचायला खचित नव्हे ! आणि हा प्रसंग माझेवर येईल अशी मला बिलकूल कल्पनाही नव्हती. बाकी दिगूची किंमत मी मागील खेपेलाच बहुतेक ओळखली होती. पण परत वर्तमानपत्रांतून त्याची स्तुतिस्तोत्रें वाचून मला भुरळ पडली आणि मी परत त्याच्याकडे आलों ! पण आतां मात्र माझे डोळे लख्ख उघडले. अलीकडील या सवंग सुकाळाच्या झालेल्या वर्तमानपत्रांवर कोणीही विश्वास ठेवूं नये, असें मी ज्याला त्याला आतां जीव तोडून सांगणार ! आणि मी एवढेंच जरी केलें, तरी ती कांहीं लहानसान देशसेवा होणार नाहीं ! हीं वर्तमानपत्रें क्षुद्र लाभासाठीं कवडी किंमतीच्या माणसाचीं स्तुतिस्तोत्रें गायला कमी करणार नाहींत आणि क्षुल्लक कारणासाठीं एखाद्या जगद्वंद्य महात्म्याची अनिर्वाच्य निंदाही करण्यास मागेंपुढें पाहाणार नाहींत, याविषयीं माझी आतां पुरी खात्री होऊन चुकली !

शेवटी झाली एवढी देशसेवा पुरे झाली असें समजून मी आतां परत आपल्या गांवी जाण्यासाठीं येथून रातोरात निघण्याचें ठरविलें ! बायकोचा पार्ट घेऊन या मेळयांत नाचून, भिकारी वर्तमानपत्रांतून प्रसिद्धी मिळविण्यापेक्षां कोकणांतल्या माझ्या खाडीकांठच्या त्या शांत आणि रमणीय झोंपडींत माझें आयुष्य अज्ञातस्थितींत गेलेलें हजारपट पत्करलें असा निश्चय केला आणि मी त्याचक्षणीं धर्मवीर दिगूभाऊची संगति सोडून घरचा रस्ता सुधारला !

---

# शामराव आणि आगगाडी !

शामराव जोंपर्यंत गिरगांवांत रहात होते, तोंपर्यंत त्यांची आणि आग-गाडीची भेट क्वचितच होत असे. भगभग करीत करवल्यांप्रमाणें ऐटीनें मिरवणाऱ्या लोकल गाड्या ते दररोज पहात असत, आणि त्यांच्याकडे पाहून त्यांना त्या गाड्यांचें कौतुकहि वाटत असे. मुंबईच्या आसपासच्या भागांत राहून रोज लोकल गाडीनें मुंबईंत येणाऱ्या लोकांची चैन असावी, असेंहि त्यांना वाटे. पण कर्मधर्मसंयोगानें ते जेव्हां बाहेर रहावयाला जाऊन लोकल ट्रेनचे डेली पॅसेंजर बनले, तेव्हां त्यांना थोड्याच दिवसांत आगगाडीच्या मजेचें सुख कळून आलें. आणि 'दुरून डोंगर साजरे' या म्हणीचें बरोबर प्रत्यंतर आल !

झावबाचे वाडींत × × नंबरचे चाळींत तळमजल्याच्या शेवटच्या सिंगल खोलींत शामरावांनीं आपला संसार थाटलेला होता. शामरावांच्या खोलींत दिवसा रात्रीचा भास होईल, असा उजेड होता. आणि त्यांची खोली, संडास व नळ यांच्या सरहद्दी अगदीं एकमेकांना भिडलेल्या असल्यामुळें शामरावांच्या खोली-पुढें भर उन्हाळ्यांतसुद्धां पावसाळ्याचा सीन उभा रहात असे ! या एकंदर परिस्थितीचा परिणाम शामरावांच्या प्रकृतीवर असा झाला, की जीवरक्षणार्थ त्यांना मुंबईच्या चतुःसीमेच्या बाहेर आपलें निवासस्थान करणें भाग पडलें ! शामराव ज्या गांवीं आतां रहायला आले, तें गांव वांद्र्यापासून एक दोन स्टेशनें पुढें होतें. या गांवी भाड्यानें जागा मिळविण्याचे बाबतींत शाम-रावांना जी मेहनत पडली आणि ज्या खस्ता खाव्या लागल्या त्यांचें वर्णन करायला एखादा महान लेखकच हवा ! तसें पाहिलें, तर जागा पुष्कळ रिकाम्या होत्या. पण त्यांचें भाडें अगदीं माफक म्हणजे जवळ जवळ शामरावांच्या पगाराइतकें होतें. त्यामुळें अशा जागेंत राहिलें असतां मोकळी हवा खाण्यास मिळेल पण अन्न मिळणार नाहीं, असा पेंच शामरावांना पडला. अन्नावांचून मरावें कीं हवेवांचून

मरावें या कोड्याचें उत्तर त्यांना कांहीं केल्या उलगडेना ! शेवटीं त्यांची ही अवस्था अवलोकन करून एका घरवाल्याचें दयाळू अंतःकरण विरघळलें. आणि आपली लांकडें व कोळसा ठेवण्याची झोंपडी क्षणार्धांत रिकामी करून त्यानें ती शामरावांना केवळ वीस रुपये भाड्यानें बहाल केली !

या नवीन जागेंत येऊन राहिल्याबरोबर शामरावांच्या ही गोष्ट नजरेस आली, कीं मनुष्याला अन्न आणि पाणी यांची जितकी आवश्यकता आहे, तितकीच येथें रहाणाऱ्याला रेल्वेचा पास आणि घड्याळ या दुकलीची जरुरी आहे ! अर्थात् रहायला आल्याच्या दुसरेच दिवशीं त्यांनीं एक चर्चगेटचा नवा कोरा, लालभडक रंगाचा पास खरेदी केला. पण त्यांनीं घड्याळ मात्र नवें आणलें नाहीं. नवें घड्याळ घेण्याला त्यांच्या जवळ आतां फारशी मायाच शिल्लक राहिली नव्हती. त्यामुळें आजकालचीं छिचोर आणि टारगी घड्याळें घेण्यापेक्षां ज्यानें जगाचा दहावीस वर्षे अनुभव घेतला आहे आणि ज्यानें बरेच टक्के टोणपे खाल्ले आहेत असें एक पोक्त घड्याळच त्यांनीं खरेदी केलें ! त्याची तांबरलेली केस, फुटकी कांच आणि तैमुरलंगी कांटे या सर्व गोष्टी, वीराला रणांगणावर झालेल्या जखमांप्रमाणें त्या घड्याळाला शोभाच आणीत आहेत, असें शामरावांचें मत होतें !

शनिवारी व रविवारीं अशी सर्व पूर्व तयारी करून सोमवारीं बरोबर नवाच्या ठोक्याला शामरावांनीं स्टेशनकडे कूच केलें. प्रत्येक चाळींतल्या प्रत्येक खोलींतून स्टेशनाकडे रिक्रूटभरती होत असलेली पाहून शामरावांनाही एक प्रकारचें स्फुरण चढलें ! आणि तोंडानें तंबाखू चघळीत तेहि झपाट्यानें चाल करूं लागले. ज्या डेली पॅसेंजरांचा आजवर ते हेवा करीत होते, त्यांच्यापैकींच आज ते स्वतः झाल्यामुळें त्यांच्या मुखावर एकप्रकारचें अपूर्व तेज खुलून दिसत होतें आणि त्या नादांतच ते ऐटीनें वाट कापीत चालले होते. इतक्यांत 'अहो सिग्नल पडलेला आहे' असें एकजण ओरडला. आणि दुसऱ्या एकानें 'गाडी आलीच !' असें म्हणून पळायला सुरवात केली. मग काय विचारतां ? सगळ्या मंडळींत

एकच हाहाःकार झाला, आणि जो तो जीवतोड स्टेशनकडे पळत सुटला ! मोठी भयंकरच वेळ ती ! अशावेळीं कोण कोणासाठीं थांबतो ? भाऊ भावाला ओळखीना आणि मित्र मित्रासाठीं थांबेना ! घडलेला प्रकार पाहून शामरावांनींहि प्रसंग जाणला ! आणि आपल्या पायांना टांच देऊन त्यांनीं अशी दौड मारली, कीं तरुणसुद्धां शामरावांकडे तोंडांत बोट घालून पाहूं लागले !

अशा रीतीनें शामरावांनीं गाडी तर पादाक्रांत केली; पण पुढें एक निराळाच प्रकार घडला. एक चमत्कारिक टोपी घातलेला विचित्र प्राणी गाडी चालू झाल्यावर एकाएकीं त्यांच्या डब्यांत चढला. आणि त्याबरोबर त्या डब्यांतले बरेच लोक चुळबुळ करूं लागले ! तो जेव्हां प्रत्येकाजवळ तिकीट मागूं लागला, तेव्हां तो कोण हें शामरावांच्या लक्षांत आलें ! आणि जवळ तिकीट नसल्यामुळें जेव्हां दोघां तिघांना रोख दुप्पट पैसे मोजावे लागले, तेव्हां या प्राण्याला पाहून ते लोक कावरे बावरे कां झाले, हेंही त्यांच्या लक्षांत आलें. करितां करितां तो शामरावांजवळ आला आणि ऐटीनें बोट उडवीत 'तिकेट' म्हणून म्हणाला. शामरावांनींही तितक्याच ऐटीनें ' पास ' म्हणून सांगितलें. पण त्याने तो ' दाखवा ' म्हणून हट्ट धरून बसल्यामुळें शामराव चंची चाचपूं लागले. कारण त्यांनीं चंचींतच आपला पास ठेवला होता. बराच वेळ इकडे तिकडे करून ते म्हणतात,–" अरे च्या ! चंची घरींच राहिली कीं !"

" वा ! बतावणी तर खूप साधली आहे." तो तिकीट तपासणारा अधिकारी म्हणाला.

' बतावणी ?' शामराव संतापून म्हणाले ' आणि उद्यां पास दाखवला म्हणजे ? बतावणी म्हणे बतावणी !'

" उद्यां पास दाखविलात, तर उद्यां मी पैसे मागणार नाहीं ! बरें कुठे जायचें तुम्हाला ?"

' चर्चगेट '

' काढा नऊ आणे ' तिकीट लिहीत तो टोपीवाला म्हणाला.

'अरे ! पैसे मी चंचींतच ठेवतों. ते पण घरींच राहिले !'

'त्यांच्याबरोबर तुम्हीं पण घरींच राहिलां असतां, तर हा प्रसंग आला नसता !' तो तिकीट इन्स्पेक्टर म्हणाला. शेवटीं शामरावांच्या शेजारच्या चाळींत रहाणाऱ्या तिमाजीपंतांनीं पैसे देऊन त्या मनुष्यास वाटेस लाविलें.

'पैसे चंचींत न ठेवतां खिशांतच ठेवणें चांगलें आणि पासहि......'

'पण माझ्या अंगरख्याला खिसा असेल तर ना ?' शामरावांनीं तिमाजीपंतांना पुरतें बोलूं न देतां मध्येंच सांगितलें.

'म्हणजे ?' तिमाजीपंतांनीं आश्चर्यानें विचारलें. 'शिंप्यानें काय खिसे लावलेच नाहींत ?'

'शिंपी लाख खिसे लावील. पण मी टिकूं देईन तेव्हांना ? खिशांचा अंगरखा घालून आगगाडींतून प्रवास करायला मीं का वेडा आहें? माझ्या या अंगरख्याला एक सोडून चार खिसे होते पण मी काल खिसान खिसा पार कापून काढला !' शामरावांचें हें भाषण ऐकून डब्यांतले सारे लोक शामरावांकडे आश्चर्यानें डोळे विस्फारून पाहूं लागले ! तिमाजीपंतांची नाकापर्यंत गेलेली तपकिरीची चिमटी तशीच राहिली ! आणि त्यांची शिंकसुद्धां जिथल्या तिथें थबकून राहिली !

'आं ? काय म्हणतां काय तुम्हीं हें ?'

'तुम्हीं ऐकलेंत तेंच मी म्हणालों !' शामराव तिमाजीपंताकडे विजयी मुद्रेनें पहात म्हणाले. 'खिशांचा उपयोग मला कळत नाहीं असें समजूं नका. आणि त्यांत मला तर खिशांचा भारी षोक ! अहो, माझ्या सदऱ्यांना सुद्धां छातीवर दोन बाजूंना दोन, पोटावर मधोमध एक, आणि डाव्या उजव्या बाजूंना लोंबते खिसे दोन, मिळून पांच खिसे तरी आपले असायचेच ! पण आमच्या दूधवाल्यानें जी एक भयंकर गोष्ट सांगितली......'

'काय, काय सांगितली गोष्ट ?' तिमाजीपंतांनीं अगदीं शामरावांना चिकटून बसून विचारलें.

'गोष्ट कांहीं फारशी मोठी नाहीं, पण तिच्यांतला अर्थ फार मोठा आहे. आमचा दूधवाला वसईचा आहे. मी झावबाच्या वाडींत रहात असतांना तो आह्मांला दूध घालीत असे. गुलाम मोठा बोलघेवडा ! अन् माझ्या स्वभावाला तर अगदीं बोलायला नको !...'

'तें दिसतेंच आहे ! पण त्यानें गोष्ट काय सांगितली ?' गोष्टींवेल्हाळ तिमाजीपंत अधीरतेनें ह्मणाले.

'अहो गोष्ट ह्मणाल तर गोष्ट; नाहीं तर कांहीं नाहीं ! गोष्ट कसली ती ? चुटकाच ह्मणाना ?'

'कबूल ! पण काय तो ?' तिमाजीपंतांनीं हताश होऊन विचारलें !

'आमचा दूधवाला वसईहून रोज पहांटेच्या गाडीनें आपली कावड घेऊन मुंबईस येतो. काय समजलेत ?' आपल्या हाताचीं तीन बोटें तिमाजीपंताच्या तपकिरीच्या डबींत खुपशीत शामराव ह्मणाले. 'हा त्याचा क्रम अगदीं नेहमीं चाललेला आहे बरें ! त्यांत एक दिवस खळ नाहीं एक दिवस !'

'कबूल ! पण पुढें काय ?' तिमाजीपंत कंटाळून ह्मणाले.

'अहो पुढें काय असायचें आहे ? वसईवाला झाला म्हणून काय झालें ? तोहि माणूसच आहे ! इतक्या पहांटे गाडींत बसल्यावर बिचाऱ्याला जरा झोंपेची डुलकी आली, तर काय गुन्हा झाला ?'

'ह्मणतो कोण !' तिमाजीपंत आश्चर्यानें म्हणाले.

'म्हणत कोणी नाहीं ! पण गाडींत झोंपणें हा गुन्हाच आहे ! आणि खिशाचा अंगरखा घालून निजणें हा त्याहून मोठा गुन्हा आहे ! कसा म्हणून नाहीं विचारलेंत ?'

'तो कसा काय बुवा ?'

'तीच तर गंमत आहे ! आमचा तो वसईवाला ग्रँटरोडला जागा झाला. आणि किती वाजले म्हणून खिशांतल्या घड्याळाकडे हात नेतो तों काय सारेंच ऑफस !'

‘ म्हणजे ? घड्याळ कोणी लांबवलें वाटतें ? ’

‘ हॅं: हॅं: ! अहो मुळीं खिसाच जेथें जाग्यावर राहला नाहीं, तेथें घड्याळ कोठचें राहणार ? घड्याळ गेलें, पांच रुपयांची नोट गेली, आणि एक कोरीकरकरीत डायरीहि गेली ! ही गोष्ट ऐकल्यावर मी तावड-तोब माझ्या सगळ्या खिशांची कत्तल करून टाकली ! या खिसेकातरूंचे असेच दांत पाडले पाहिजेत ! ’ शामराव खूब मोठ्यानें हंसले. आणि त्यांची गोष्ट ऐकणारे सारे उतारूहि तितक्याच मोठ्यानें खोखावले. आतां त्यांच्या व शामरावांच्या हंसण्याचें कारण अगदीं वेगळें होतें, ही गोष्ट अलाहिदा !

* * * * * *

लोकल गाडीच्या पहिल्या दिवसाच्या या प्रवासावरून शामरावांच्या लक्षांत येऊन चुकलें, कीं रेल्वेचा पास नुसता विकत घेऊन भागत नसून, गाडींत बसतांना तो बाळगलाच पाहिजे. तो बाळगायचा ह्मणजे आंगरख्याला खिसा लावला पाहिजे. आणि प्राण गेला तरी अंगरख्याला खिसा लावायचा नाहीं, ही तर शामरावांची प्रतिज्ञा ! पण शामरावच ते ! ते काय अडून बसतात ! मुंज झाल्यावर हरिणाच्या कातड्याचा तुकडा जानव्यांत अडकावतात, त्याचें त्यांना एकाएकीं स्मरण झालें आणि आपल्या त्या पासाला दाभणानें एक भोंक पाडून त्यांनीं तो आपल्या जानव्यांत कायमचा अडकावून टाकला ! ‘ आतां ये लेका पास विचारा-यला ! ’ जानव्यांत लोंबणाऱ्या त्या पासाच्या लाल तुकड्याकडे पहात शामराव स्वतःशींच पुटपुटले !

दुसरे दिवशीं शामराव निर्धास्तपणानें स्टेशनाकडे चालले. पण ते स्टेश-नांत शिरायला, आणि त्यांची गाडी स्टेशनांतून बाहेर पडायला एकच गांठ पडली ! शामरावांचें घड्याळ तर बरोबर होतें. मग असें कसें झालें ? ‘ काय हो, नऊ छत्तीसची गाडी गेली ? ’ शामरावांनीं स्टेशनवरच्या तिकीट कलेक्टरला विचारिलें.

‘ हो ! ’ तो ह्मणाला.

‘ केव्हां गेली ? ’

‘ नऊ छत्तीसला ! ’

‘ भल्या गृहस्था ! हे आतां कुठे नऊ छत्तीस होताहेत. ’ आपल्या हातांतील चंदीच्या कप्यांतलें घड्याळ त्याला दाखवीत शामराव ह्मणाले.

‘ असेल. पण रेल्वेच्या गाड्या चंदींतल्या घड्याळाप्रमाणें सुटत नाहींत! त्या रेल्वेच्या घड्याळाप्रमाणें सुटतात. ’

‘ मग तीं घड्याळें बरोबर असोत, अगर चूक असोत ! असेंच ना ? ’

‘ आतां कसें समजलेत ? ’

आज शामरावांना हा दुसरा धडा मिळाला ! घड्याळ नुसतें बरोबर वेळ दाखविणारें असून चालत नाहीं, तर तें स्टेशनवरच्या घड्याळाशीं जुळतें असलें पाहिजे. मग स्टेशनवरचें घड्याळ मागें असो, अगर पुढें असो !

पहिल्या दिवशीं पास घरीं राहिला, ह्मणून शामराव अडचणींत सांपडले. दुसऱ्या दिवशीं आपलें घड्याळ स्टेशनवरच्या घड्याळाबरहुकूम नाहीं, ह्मणून त्यांची गाडी चुकली व हपीसांत हेड क्लार्कच्या व खुद्द गोऱ्या साहेबाच्या इंग्रजी शिव्या खाव्या लागल्या. आपलें नष्टचर्य एवढ्यावरच संपलें, आणि लोकल गाडीच्या प्रवासांतल्या यावच्छक्य अडचणींचीं गंडांतरें आपल्यावरून येऊन गेलीं, असें त्यांना वाटलें. पण हा त्यांचा निवळ भ्रम होता. कारण तिसरे दिवशीं त्यांचेवर तिसरेंच संकट आलें!

घरीं बायको आजारी असल्यामुळें मोठ्या मिन्नतवारीनें अर्ध्या तासाची रजा मिळवून शामराव चर्चगेट स्टेशनवर धापा टाकीत आले. आणि देवाचें नांव घेऊन, चालत्या गाडींत उडी मारून त्यांनीं गाडीहि पकडली. आज रोजच्यापेक्षां लवकर घरीं जाऊन आपण तिला चकित करून सोडणार या कल्पनेनें ते अगदीं उंडारून गेले होते. पण अगदीं ऐन वेळीं त्यांचें कर्म ओढवलें. कारण गाडी स्टेशनांत आल्यावर ते दार उघडूं लागले, तों तें मुळीं उघडेचना! शामराव संतापले. आणि दांत चावून त्यांनीं दाराचें

हँडल उलटें, सुलटें फिरवलें. आणि लाथाहि मारल्या. पण दार उघडेल तर शपथ !

'दाराला कुलूप लागलें आहे तात्या !' आपल्या तोंडांतल्या लाल पिचकारीनें शामरावांचा अंगरखा रंगवीत, आणि नाक शिंकरलेला हात दाराच्या हँडलला पुशीत एक लाल कानटोपीचा वसईवाला हंसत हंसत म्हणाला. 'तुमच्याजवळ चावी नाहीं का तात्या ?' *

'डोंबल आहे तुझं !' बांकावरून उड्डाण करून पलीकडल्या दाराशीं जातांना शामराव म्हणाले. पण ते पलीकडच्या दाराशीं जातात, तों गाडी सुटली ! आणि शामराव हताश होऊन त्यांनीं बांकावर आपला देह टाकून दिला ! पुढच्याच स्टेशनवर शामराव उतरले. आणि दुसऱ्या प्लॅटफॉर्मवर अपट्रेन उभीच होती, तींत तांतडीनें जाऊन बसले. पण काय कर्म सांगावें ? ती गाडी जी तेथून सुटली, ती थेट वांद्रास जाऊन उभी राहिली. शामरावांच्या स्टेशनवर उभीच राहिली नाहीं ! बिचारे शामराव ! त्या गाडींतून ते निमूटपणें खालीं उतरून परत, पुढें जाणाऱ्या गाडींत बसले. आणि आपल्या स्टेशनवर उतरून बिऱ्हाडीं प्रयाण केलें. त्यांना पाहून त्यांची बायको त्यांच्या अपेक्षेप्रमाणें चकितहि झाली. पण ती शामराव लवकर आले म्हणून नव्हे, तर त्यांना कमालीचा उशीर झाला म्हणून ! वसईवाल्याच्या मुखरसामुळें आपल्या अंगरख्याला आलेली शोभा, तो खुंटीला अडकवितांना त्यांच्या दृष्टीला पडली ! ती पाहून त्यांच्या संतापलेल्या मनाला काय वाटलें असेल हें सांगायला पाहिजे काय ?

जो नवा दिवस उजाडे, तो नवें 'रेल्वेसंकट' शामरावांवर आणी ! आतां शामरावांनीं एक किल्लीही खरेदी करून ठेवली. ती किल्ली गाडीच्या दाराला लागत असली तरी लोकलगाडींत उत्पन्न होणाऱ्या प्रत्येक अडचणीची कांहीं ती किल्ली नव्हती !

असो. शामराव लोकलगाडीचे डेली प्यासेंजर बनल्यापासून आज चौथा

* ही गोष्ट इलेक्ट्रिक गाड्या होण्यापूर्वीची आहे.

दिवस उजाडला. आणि आज चौथें संकट त्यांच्यावर येऊन कोसळलें ! त्या दिवशीं पाऊस काय मुसळधार पडत होता. त्या धूमधडाक्यांतच शामराव आपल्या हपीसरूपी कोंडवाड्यांतून बाहेर पडले. पळत जाऊन त्यांनीं पांच शेर लोणी खरेदी केलें. आणि त्याच वेगानें तडक त्यांनीं स्टेशनही गांठलें. तेथें पहातात तों प्लॅटफॉर्मवर माणसांची किड्यांसारखी गर्दी ! गाडी किती वाजतां येणार आहे तें बोर्डाकडे पहातात, तों गाडीची वेळ दाखविणारे दोन्ही कांटे बाराच्या आंकड्यावर डांबून टाकिलेले असून, त्यांच्या गळ्यांत ' लोकल सर्व्हिस डिस्–ऑर्गनाइज्ड ' अशी पाटी अडकावलेली ! ती पाटी वाचून शामरावांच्या डोक्यांत लख्ख प्रकाश पडला. वाटेल ती गाडी वाटेल तेव्हां येत होती. आणि तींत वाटेल ते लोक वाटेल तसे घुसत होते ! गाडींत उभें रहायला सुद्धां तिळभर जागा दिसत नव्हती. पण मागून पुन्हां गाडी केव्हां येणार, आणि ती कुठपर्यंत मजल मारणार याचा मुळींच नेम नव्हता. त्यामुळें शामरावांनीं लोण्याचा पुडा खांद्यावर टाकला, आणि कुलदेवतेचें स्मरण करून त्यांनीं गाडीच्या एका दारापुढील फळकटावर आपले दोन्ही पाय रोंवले ! डब्यांत उभे राहिलेले लोक ' जगा नहीं ' असें ओरडून त्यांना बाहेर ढकलीत होते. आणि आंत घुसण्याकरितां शामरावांच्या मागें नंबर लावून दाराशीं उभे असलेले लोक त्यांना ' अंदर घूसो ' असें ह्मणून आंत रेंटीत होते ! आणि शामराव एखाद्या खंबीर सेनानायकाप्रमाणें, हातांत ( नव्हे, पायांत ) सांपडलेलें ठाणें पकडून खंबीरपणें उभे होते. नंतर कांहीं वेळ तुमुल रणकंदन झाल्यावर शामरावांना दोन पावलें टेंकण्यापुरती जागा मिळाली. आणि डोक्यावर लोण्याचा पुडा धारण करून, ते खांबाप्रमाणें अचल उभे राहिले.

चांगलीं पांचसहा स्टेशनें गेल्यावर गर्दी थोडीशी कमी झाली. आणि शामराव हुश्श करीत खालीं बसून त्यांनीं डोक्याची पगडी शेजारीं काढून ठेवली. आणि तीवर तो लोण्याचा पुडा जरा ठेवून दिला. गाडीहि सुटली. इतक्यांत एक अगडबंब पोटाचा पारशी काका धांवत धांवत आला. आणि कसा तरी दाराला ओळंबिंबा घेऊन शामरावांच्या शेजारीं एकदम बसला. त्याचें

पोट आणि कोटाचा घेर हीं एवढीं प्रचंड होतीं, कीं त्याखालीं दोन तीन माणसें सहज झांकलीं गेलीं असतीं! मग त्या पारशीकाकाच्या खालीं सांपडलेल्या लोण्याच्या पुडयाचें आणि गरीब बिचाऱ्या शामरावाच्या पगडीचें काय झालें असेल, हें काय सांगायला पाहिजे? पगडी पार चेंग-रली जाऊन तिचा हुबेहूब वाडगा बनला. आणि तो वाडगा, पिरपिरीत झालेल्या लोण्यानें भरून वाहूं लागला! गाडींतले लोक पोट धरधरून हंसूं लागले. झालेला प्रकार पाहून बिचारे शामराव हतबुद्धच होऊन गेले! त्यांना हंसावें का रडावें हेंच बराच वेळ समजेना!

बिचाऱ्या शामरावांवर अशीं नित्य नवीं अनेक संकटें आगगाडीनें आणलीं. आणि त्या धैर्यशाली पुरुषानें त्या सर्वांना तोंडही दिलें. विस्तारभयास्तव त्यांचें वर्णन आतां येथें देत नाहीं. पण आपल्या या खडतर अनुभवांवरून, बी. बी. सी. आय. रेल्वेच्या लोकल गाड्यांनीं प्रवास करणाऱ्या दुर्दैवी मानवांच्या कल्याणार्थ, शामरावांनीं आपल्या स्मरणवहींत जे नियम लिहून ठेविले आहेत, ते येथें उद्धृत करून हा लेख संपवितों.

## शामरावांची स्मरणवही.

( १ ) पास नेहमीं जानव्यांत अडकावून ठेवावा. ज्यांस जानवें नसेल त्यांनीं पास एका दोरींत ओंवून तो पासाचा कामधेनु ताईत आपल्या गळ्यांत सदैव बांधून ठेवावा. तिकिटें तपासणाऱ्या सर्व अधिकाऱ्यांपासून रक्षण होण्याच्या बाबतींत हा ताईत केवळ कामधेनु ताईत आहे.

( २ ) आगगाडींत बसल्यावर लोण्याचा पुडा अगर डोक्याची पगडी हीं शेजारीं बांकावर ठेवूं नयेत. सर्व सामान स्वतःच्या मांडीवर अगर डोक्यावर धारण करावें. असें न केल्यास अनर्थ होण्याचा संभव असतो.

( ३ ) लोकल गाडी कोठपर्यंत जाणारी आहे, हें पाहिल्याशिवाय तींत बसूं नये आणि जरी ती वांद्र्याच्या पुढें जाणारी असली, तरी वांद्रा स्टेशन येतांच सर्व सामानसुमान खांद्यावर घेऊन खालीं उतरण्याच्या अगदीं तयारींत असावें. कारण, गाडीचें पुढें जाणें केव्हां कॅन्सल होईल याचा मुळींच भरंवसा नसतो.

( ४ ) दारें उघडण्याची किल्ली नेहमीं जवळ बाळगावी. आणि आपणांस उतरायचें, तेथील प्लॅटफॉर्म उलट बाजूला असेल, तर अगोदर निदान दोन तीन स्टेशनांपासूनच दार उघडण्याच्या उद्योगास लागावें. उदाहरणार्थ माटुंग्यास उतरायचें असेल तर महालक्ष्मीपासून हातांत किल्ली घेऊन दाराशीं झुंज खेळण्यास लागावें.

( ५ ) आगगाडींत चोर खिसे कापण्यापेक्षां आपणच आपले खिसे अगोदर कापून टाकावे. ह्मणजे खिसेकापूंचे चांगले दांत पडतील.

( ६ ) चोरांचा बंदोबस्त अशा रीतीनें केला तरी आगगाडींत झोंपूं नये. कारण झोंप आल्यास आपण ठेपी कुलाब्यास जाण्याचा संभव असतो. उतारूंस झोंप येऊं नये म्हणून दयाळू कंपनीनें ढेंकणांची भरपूर तरतूद प्रत्येक बांकांतून करून ठेवलेलीच आहे. तथापि जास्त झोंपाळू असलेल्या उतारूनें दर स्टेशनास स्वतःला चिमटे घेत असावें. असें केल्यानें वेदना ह्या होणारच. पण ज्यास आपलें कल्याण व्हावें अशी इच्छा असेल, त्यानें त्या निमूटपणें सोसल्या पाहिजेत.

( ७ ) आगगाडीनें आपल्या हातास अकस्मात् दंश करूं नये, म्हणून दाराजवळ न बसतां, दोन्ही दारांच्या बरोबर मध्यावर बसण्याचा शिरस्ता ठेवावा. लोक कोंपरा पटकावण्यासाठीं धडपडत असतात, पण त्यांचें तें निवळ अज्ञान आहे.

( ८ ) एकावर एक पानपट्या चघळणारा एखादा हिंदु, मुसलमान, अगर एकसारखी तमाखूची नळी तोंडांत धरणारा देशी साहेब, आपल्या शेजारीं बसल्यास आपण आपले हात पाय पोटाशीं गुंडाळून गुपचूप बसावें. असें न केल्यास त्यांच्या थुंकीच्या माऱ्यांत आपले हात पाय व नळीच्या ठिणग्यांच्या मारांत आपले कपडे सांपडण्याचा संभव असतो !



# मिया मूठभर आणि दाढी हातभर !

श्रीयुत पुंडे यांचें नांव माहीत नाहीं, असा मनुष्य सबंध गांवांत सांपडणें जवळ जवळ अशक्यच ! याचें कारण ह्मणजे श्री. पुंडे यांचा क्रांतिप्रिय स्वभाव हेंच होय. 'क्रान्तिप्रिय' हें विशेषण वाचून आमच्या राजनिष्ठ वाचकांच्या कोमल हृदयाला कदाचित् जबरदस्त धक्का बसेल ! ह्मणून हें येथें स्पष्ट आणि ठांसून सांगणें अवश्य आहे कीं 'क्रान्तिप्रिय' या शब्दाचा राजकीय दृष्ट्या कोणीहि अर्थ लावूं नये. आमचे श्रीयुत क्रान्तिप्रिय होते. पण ती क्रान्ति, ह्मणजे पोषाख, आहार आणि विहार असल्या महत्वाच्या बाबतींत वारंवार झाली पाहिजे, असें त्यांचें मत होतें. राजकीय गोष्टींत, आणि विशेषत: प्रत्यक्ष चटके बसणाऱ्या असहकारितेसारख्या चळवळींत पडणें त्यांना बिलकूल आवडत नसून तसल्या अव्यवहार्य गोष्टींत ते कधींही मन घालीत नसत ! पण एवढा एक विषय वगळला ह्मणजे बाकीच्या गोष्टींत ते पक्के क्रान्तिप्रिय होते. गतानुगतित्वाचा त्यांना पुरा तिटकारा होता आणि जेवढें ह्मणून नवीन दिसेल तेवढें ताबडतोब उचलावें हें त्यांचें अगदीं ठाम मत होतें !

हा त्यांचा स्वभाव अगदीं बाळपणापासूनच लोकांच्या नजरेस आला. रोज सकाळीं उठायच आणि निमूटपणें दप्तराची धोकटी कांखेस अडकावून शाळेचा रस्ता सुधारायचा, या गतानुगतित्वाचा त्यांना दोनचार दिवसांतच तिटकारा आला ! या त्यांच्या स्वतंत्र बुद्धीचें वास्तविक कौतुकच व्हायला पाहिजे होतें. पण त्यांचे आईबाप पक्के अरसिक असल्यामुळें या चिमुकल्या फेरेवाल्याला त्यांनीं सक्तीनें शाळेंत डांबण्याचा उद्योग सतत चालविला. घरच्या माणसांचें एक राहो, पण निदान मास्तरांनीं तरी या स्वतंत्र बुद्धीच्या मुलाचें कौतुक करावें कीं नाहीं ? पण सगळे एका माळेचे मणी ! मास्तरांनीं क्रियापद ह्मणजे काय ह्मणून विचारावें आणि मुलांनीं त्यावर पाठ केलेलें ठराविक उत्तर द्यावें, या प्रकाराचा श्रीयुत पुंडे यांना अगदीं तिटकारा येत असे. शिवाजी कधीं

जन्मला या प्रश्नाला आपलें १६२७ हें ठराविक उत्तर ! काय हा जुलूम ! आणि तोहि पुंड्यांसारख्या स्वतंत्र बुद्धीच्या आणि क्रान्तिप्रिय स्वभावाच्या चुणचुणीत पोरावर ! पण पुंड्यांनीं ह्या प्रकाराविरुद्ध अगदीं उघड उघड बंड पुकारलें. त्यांनीं अभ्यासाच्या पुस्तकांवर कडकडीत बहिष्कार घातला आणि मास्तरांनी विचारलेल्या प्रश्नास ठराविक उत्तर न देतां तोंडास येईल तें उत्तर छातीठोकपणानें देण्याचा क्रम आरंभला. सिंधुनदी कोठें उगम पावली आणि कोठें मिळाली असा एकदां प्रश्न विचारला असतां 'सिंधुनदी तिबेटांतील आरबी समुद्रांत उगम पावून, मद्रासजवळ मानससरोवरास मिळते' असें चोख उत्तर पुंड्यांनीं दिलें ! याचा परिणाम व्हायचा तोच झाला. असला स्वतंत्र बाणा आणि ही धडाडी मास्तरला कोठून रुचणार ? पुंड्यांचा हा बाणेदारपणा म्हणजे त्या बेजबाबदार मास्तरला जणूं पुंडाईच वाटली. आणि त्यानें न्यायान्यायाची पर्वा न करतां सर्वांसमक्ष त्या वीराच्या हातावर तीन फटके ओढले !

बाप आणि मास्तर यांच्या अरसिकपणामुळें अशा रीतीनें श्री. पुंडे यांच्या या धडाडीचा जरी कोंडमारा झाला, तरी काळ अनुकूल येतांच त्यांच्या या क्रांतिप्रिय स्वभावानें आपलें डोकें वर काढलें. बाप वारला, शाळा सुटली आणि श्री. पुंडे हे पोरासोरांत खर्चीं पडून तरुणांत जमा होऊं लागले. ओंठावर मिसरूड वाढूं लागली. ओंठांचे आंत वाचाळता वाढूं लागली आणि पुंड्यांचा स्वतंत्र बुद्धीचा स्वभावहि वाढीस लागला ! आणि त्यांनीं प्रथम सामाजिक चालीरीती आणि शिष्टाचार यांचा समाचार घेण्यास सुरुवात केली.

एक दिवस आरशांत पहात असतां सहज त्यांचें लक्ष त्यांच्या मिशांकडे गेलें. लगेच मिशांचा फेंचकट ठेवण्याचा विचार त्यांच्या चलाख डोक्यांत आला आणि नंतर तो कृतींत उतरविण्यासहि त्यांनीं विलंब लावला नाहीं ! दोन्ही मिशांचा शेवटाकडील थोडथोडा भाग त्यांनीं काढून टाकला आणि ज्याप्रमाणें इंग्रज भराभर हिंदुस्थानचा एकेक प्रांत काबीज करूं लागले

त्याप्रमाणें आपल्या मिशांचा जास्त जास्त भाग श्री. पुंडे कुरतडून काढूं लागले. असें करतांकरतां शेवटीं त्यांच्या मिशा एवढ्या थोड्या शिल्लक राहिल्या, कीं त्यांच्या दोन्ही नाकपुड्यांखालीं केवळ वालाच्या दाण्याएवढे दोन काळे ठिपकेच दिसूं लागले. आणि शेवटीं चार दिवसांनीं मिशांच्या त्या शेष भागालाहि चाट मिळून त्यांचें अगदीं साफ उच्चाटण झालें ! अशा स्थितींत कांहीं दिवस गेल्यावर श्री. पुंड्यांच्या लहरीनें उलट कलांडणी मारली आणि आतां पुनश्च हरिःओम् करून त्यांनीं आपल्या मिशा वाढविण्याचा विचार केला. एखाद्या हुशार शेतकऱ्याप्रमाणें त्यांनीं आतां आपलें संपूर्ण लक्ष मिशांच्या जोपासनेकडेच लावलें ! त्यांचें हें कृत्य गांवांतील लोकांना माकडचेष्टेसारखें वाटून, ते त्यांना हंसूं लागले. पण पुंडे यांनीं आपल्या मनाची शांति बिलकूल ढळूं दिली नाहीं. सुधारणा आणि नवे नवे प्रयोग करणाऱ्याला जग असेंच हंसायाचें हें त्यांना माहित होतें.

मिशांवरील प्रयोग संपल्यावर त्यांचें लक्ष सहजच दाढीकडे वळलें. दाढीच्या एकाहि केसानें आपलें डोकें वर उचलूं नये, ह्मणून पुंडे आपल्या हनुवटीवरून रोज दोनदां वस्तऱ्याचे हात फिरवित असत. पण आतां तें मान एकदम बदललें आणि जे पुंडे दाढीचा नायनाट व्हावा म्हणून तिला रोज तलवारीच्या तीक्ष्ण धारेवर धरीत असत, तेच पुंडे आतां आपली तलवार (वस्तरा) म्यान करून दाढी लवकर लवकर कशी वाढेल या विवंचनेंत पडले ! पण वास्तविक त्यांना अशी विवंचना करण्याचें कारण नव्हतें. ज्ञानाच्या किंवा विवेकाच्या वाढीला जसा विलक्षण खटाटोप करावा लागतो, तसा दाढीच्या वाढीला मुळींच करावा लागत नाहीं. एक शीर सलामत असलें ह्मणजे दाढी अगदीं आपोआप वाढते !

आणि पुंड्यांच्याहि लक्षांत ही गोष्ट लवकरच आली. चार चार दिवसांनीं ते आपल्या दाढीचें मोजमाप घेऊन तें आपल्या स्मरणवहींत टिपून ठेवीत असत. त्यावरून आपली दाढी प्रत्यहीं वाढत आहे, ही गोष्ट स्पष्टपणें त्यांच्या नजरेस येऊन त्यांचा हुरूप वाढत चालला होता.

तरी पण अनेक केशवर्धक तेलें ते दाढीला चोळीतच होते. करतां करतां त्यांच्या दाढीचा पसारा चांगलाच वाढला आणि एक दिवस आपल्या दाढीची लांबी १४॥ इंच भरल्याचें त्यांना आढळून आलें ! त्या लांबलचक दाढीमुळें त्यांना आपला चेहरा विशेष रुबाबदारीचा दिसला आणि त्यामुळें आपल्या दाढीबरोबर आपली अक्कलहि वाढली असावी, असा त्यांना भास झाला ! इतकेंच काय, पण बेंबीपर्यंत पसरलेल्या त्या भव्य दाढीकडे पाहून त्यांची प्रतिभा* देखील एकदम जागी झाली आणि ते तत्काळ त्या दाढी इतकेंच लांब असें एक काव्य प्रसवते झाले. कवितेला नांव काय द्यावें याचीहि त्यांना विशेष पंचाईत पडली नाहीं. दाढीकडे पाहून त्यांची कविता प्रगट झाली होती. ह्मणून ' दाढीकडे पाहून ' हेंच नांव त्यांनीं सदरहू कवितेला दिलें. घरांत पडून उगाच तिची वाफ जाऊं नये, ह्मणून त्यानीं ती ताजी ताजी असतांच तिचें पुडकें तयार केलें. सदरहू कविता ' काव्यविडंबन ' मासिकाच्या संपादकाकडे ताबडतोब पाठविण्याचा त्यांचा बेत होता. पण तें ' बुकपोस्ट ' बांधायला आयत्या वेळी दोरच सांपडेना ! इतक्यांत त्यांचें लक्ष स्वतःच्या लोंबत्या दाढीकडे गेलें आणि डोक्यांत लख्ख प्रकाश पडला ! कात्री घेऊन चटकन त्यांनीं आपल्या दाढीची एक लहानशी बट काढली आणि तिचा तें कवितेचें पुडकें बांधण्याकडे उपयोग केला !

वरील गोष्ट क्षुल्लक खरी, पण तीमुळें दाढीकडे पहाण्याची पुंड्यांची दृष्टि एकदम बदलून गेली. आतांपर्यंत ते निवळ शोभेच्या दृष्टीनें आपल्या दाढीकडे पहात होते. पण आतां ते व्यवहाराच्या दृष्टीनें,—उपयुक्ततेच्या दृष्टीनें—पाहूं लागले आणि अशा रीतीनें त्यांचा दृष्टिकोन बदलल्यावर दाढीच्या उपयुक्ततेच्या गोष्टीहि भराभर त्यांच्या नजरेस येऊं लागल्या. दुपारीं जेवतांना त्यांना असें आढळून आलें, कीं आमटींतील डाळगाटे, उसळीचे दाणे आणि भाताचीं शितें हीं खालीं न पडतां त्या सर्वांना आपल्या कल्लेदार दाढीनें वरच्यावर झेलून धरलें

* श्री. पुंडे हे कवि होते, ही महत्त्वाची गोष्ट सांगण्याचें राहूनच गेलें !

आहे ! आणि त्यामुळें, त्या चुकारतट्टूंना पकडून पुन्हां तोंडांत टाकणें आपल्याला शक्य झालें आहे !

जेवण झाल्यावर ते जेव्हां बाहेर जाण्याकरितां निघाले, तेव्हां खालील शब्द त्यांच्या कर्णपथावर येऊन आदळले:—' ऐकलें का ? म्हटलें आज तरी बबीसाठीं आठवणीनें बेंडबाजा आणावा ! पोरीनें......'

' हो हो......'

' हो हो काय ? जळ्ळी मेली आठवण कसली ती मुळींच रहात नाहीं, आणि ही कारटी तर मला पाणी सुद्धां पिऊं देत नाहीं.' बोलतां बोलतां मिसेस पुंडे यांचा आवाज तिसऱ्या सप्तकापर्यंत चढला. त्यांनीं हातांतलें भांडें जोरानें खालीं आपटलें. त्या भांड्याचा आपल्या अंगाला स्पर्श झाला, असें बबीला वाटलें आणि त्यामुळें तिनें एकदम आपल्या तोंडाचा बेंडबाजा खड्या सुरांत चालू केला !

आपण जर यापूर्वींच बेंडबाजा आणला असता, तर बबीचा हा तोंडाचा बेंडबाजा रोजच्यारोज ऐकण्याची पाळी आपल्यावर आली नसती, असें पुंड्यांना वाटलें. पण नुसतें वाटून उपयोग काय ? असें त्यांना रोज वाटत असे. पण बाहेर पडल्यावर आठवण राहील तर शपथ ! आज त्यांनीं अगदीं पदराला गांठ मारण्याचाच विचार केला. पण त्यांना पदर कोठें होता ? त्यांना पदरहि नव्हता आणि गांठ मारण्यासारखी त्यांची शेंडीहि नव्हती. पण शेंडी नसली, तरी सतरा गांठीसुद्धां मारतां येतील अशी भव्य दाढी मात्र आजकाल त्यांच्या पदरीं होती ! आणि तसा विचारच केला, तर शेंडी मोठी असली आणि तिला गांठ मारतां आली, तरी उपयोग काय ? एखाद्या गोष्टीची आठवण रहाण्यासाठीं तुम्ही शेंडीला गांठ मारूं शकाल, पण त्या शेंडीची तरी आठवण रहायला पाहिजे ना ? आठवण राहणें, हें वास्तविक डोक्याचें काम. पण ज्याला तें डोकेंच नाहीं, त्याला शेंडी चांगली हातभर लांब असली, तरी तिचा उपयोग काय ?

पण दाढीचें तसें नाहीं ! ज्याला लांबलचक दाढी आहे, त्याला मग

डोक्याची तितकीशी जरूर नाहीं ! ज्याला लांबलचक दाढी आहे, त्याला आठवण राहण्यासाठीं डोक्याची मुळींच गरज नाहीं. त्याला डोळे असले, ह्मणजे बस्स ! त्याला आपली दाढी नजरेसमोर ठेवण्याची मुळींच तसदी पडत नाहीं. कारण ती नेहमीं नजरेसमोरच असते ! शिवाय दाढीच्या टोंकाला चांगली भलीभक्कम गांठ मारून ठेवली, ह्मणजे सहज दाढीवरून हात फिरवितांना ती हाताला जाणवते आणि त्यामुळें सहजच त्या गोष्टीचें स्मरण होतें.

पण पुंड्यांना खरें म्हटलें, तर तेवढीहि तसदी पडली नाहीं. दाढीला चांगली गांठ मारून बाहेर पडल्यावर त्यांना जे जे इसम भेटले, त्यापैकीं प्रत्येकानें त्यांच्या दाढीच्या गांठीकडे कौतुकानें पाहून ' आज हा काय बुवा नवीन प्रकार आहे ? ' ह्मणून विचारलें आणि त्यामुळें तितक्या वेळां त्यांना आपल्या बबीच्या बेंडबाजाची उजळणी लोकांजवळ करावी लागली ! अशा स्थितींत विस्मरण होण्याचें नांव कशाला ? इतकेंच नव्हे, तर या बेंडबाजाच्या उजळणीला कंटाळून ते अगोदर बाजारांत गेले आणि एक बेंडबाजा खरेदी करून त्यांनीं तो घरीं येऊन बबीच्या हातांत दिला आणि मग दाढीची गांठ सोडून टाकून ते निर्धास्तपणें परत घराच्या बाहेर पडले ! हा सारा परिणाम दाढीच्या गांठीचा आहे ! तेच तुह्मीं शेंडीला एक सोडून दोन गांठी मारून बाहेर पडाना ? त्या तुह्मी कां मारल्या ह्मणून तुह्मांला कुत्रेंसुद्धां विचारायचें नाहीं !

दाढीपासून असे अनेक फायदे असून, शिवाय ती राखण्यापासून पैशांची बचत होते, ती वेगळीच. पूर्वी पुंडे आठवड्यांतून चार वेळां दाढी करीत असत. दर वेळेला दोन आणे, ह्मणजे क्षुल्लक रकम वाटते. पण वर्षाचा आढावा पाहिल्यावर दाढीपायीं पंचवीस रुपयांचा खर्च आल्याचें पुंड्यांना आढळून आलें. या हिशेबानें, सर्व जगांतील पुरुषांचे दाढीपायीं सालीना किती रुपये जात असतील, याचा हिशेब करून तो आंकडा पुंड्यांनीं आह्मांला दाखवला, तेव्हां ती लांबलचक संख्या आह्मांला एकदम

मोजवलीसुद्धां नाहीं ! ती संख्या आतां आमच्या लक्षांत नाही. पण प्रथम कांहीं आंकडे असून त्यावर चांगलीं दहाबारा पृष्ठें होतीं ! दाढी काढण्यापासून लोक दाढीला तर आंचवतातच पण शिवाय ती वारंवार खरडून काढण्याच्या कामीं एवढ्या मोठ्या जंगी रकमेचाहि ते व्यर्थ चुराडा करून टाकतात !

दाढी करण्याला जसा खर्च येतो, तसा दाढी राखण्यालाहि खर्च येत असेल, अशी चुकीची समजूत कोणी करून घेऊं नये. कोणी कोणी दाढी विंचरून साफ कारितात व तिला तेलहि चोपडतात, ही गोष्ट खरी आहे. पण दाढी राखणाऱ्यानें ती विंचरलीच पाहिजे आणि तिला तेल लावलेंच पाहिजे, असें मुळींच नाहीं ! हे रिकामे चोंचले आहेत. आमच्या पुष्कळांनी कैक दिवस आपल्या दाढीला फणी लावली नाहीं, कीं तेल दाखविलें नाहीं. पण ह्मणून त्यांची दाढी वाढायची थोडीच थांबली आहे ? पावसाळ्यांत रान उगवतें, त्याची कोण व्यवस्था ठेवतो आहे ? पण तें वाढायचें थांबतें का ? झालें तर मग. जें ब्रह्मांडीं तें पिंडी* !

अशा प्रकारें दाढी वाढविल्यापासून खर्चांत बचत तर होतेच आणि शिवाय दाढी चांगली पल्लेदार असली ह्मणजे मनुष्य रुबाबदार, भव्य आणि विद्वानहि दिसतो ! एक दाढीचा स्पेशालिस्ट ह्मणतो—" तुमच्या डोक्यांत अक्कल असो, अगर नसो; पण तुमच्या हनुवटीवर दाढी मात्र जरूर असली पाहिजे. " हे त्याचे अनुभवाचे बोल खचित महत्वाचे आहेत. बाकी कांहीं असलें तरी मनुष्य निदान दाढीला तरी मान देतो आणि एखाद्या आडमुठ्यानें आपल्या सन्माननीय दाढीकडे दुर्लक्ष केलें, तर त्याला ' निदान माझ्या दाढीकडे तरी पहा. ' असें चक्क सांगतां येतें ! " केवळ तुझ्या दाढीकडे पाहून मी तुला गय केली आहे " असें ह्मणून अनेक किचाटां·

* प्रयोगाच्या सोयीसाठीं ' जें पिंडीं तें ब्रह्मांडीं ' या ह्मणींत थोडा (?) फेरफार केला आहे.

तून प्रतिपक्षानें पुंड्यांना सोडून दिलें असल्याचें त्यांनीं आपल्या स्मरण वहींत स्वतः लिहून ठेवलें आहे !

स्वतःची दाढी दुसऱ्याला दाखवून जसा फायदा होतो, तसा दुस ऱ्याच्या दाढीला हात लावूनहि आपला कार्यभाग साधतां येतो. प्रत्यक्ष हात लावण्याची गोष्ट कशाला ? पण ' तुझ्या दाढीला हात लावतों ' एवढे बोलूनच पुंड्यांनीं आपलीं मोठमोठीं कामें साधून घेतलीं आहेत. मात्र एव ढ्यानें काम भागलें नाहीं व दाढीला हात लावण्याचा प्रसंगच आला, त तो बेतानेंच लावावा. म्हणजे त्याची दाढी जोरानें हिसकूं नये ! नाहीं त काम होण्याऐवजीं मार खाण्याचाच प्रसंग आपल्यावर यायचा !

दाढीमुळें चेहरा किती गंभीर दिसूं लागतो आणि त्या माणसाचा रुबाब किती वाढतो, याचा अनुभव पुंडे एकदां परगांवीं गेले असतां त्यांना अगदी स्पष्टपणें आला. तेथें रात्रीं ते कीर्तनाला देवळांत गेले असतां, त्यांन लोकांनीं उत्थापन देऊन, हात धरून आग्रहानें लोडाशीं बसविलें !

दाढीचा प्रभावच तसा आहे ! कविवर्य टागोर यांना जें एवढें प्रचंड पारितोषिक मिळालें, त्यांतलें कांहीं श्रेय त्यांच्या दाढीला असलेंच पाहिजे आणि श्री. विठ्ठलभाई पटेल यांना कौन्सिलचें अध्यक्षस्थान मिळण्यांत त्यांच्या दाढीचा उपयोग बिलकुल झाला नसेल असें म्हणतां येणार नाहीं असें श्री. पुंडे यांचें प्रामाणिक मत आहे !

या सगळया गोष्टी जरी खऱ्या असल्या, तरी पुंड्यांना त्यांच्या दाढीचा खरा उपयोग हिंदुमुसलमानांच्या दंग्याच्या वेळीं झाला ! त्या प्रसंगाचे वर्णन करितांना पुंडे अगदीं देहभान विसरतात आणि शेवटीं श्रोत्यांपैकीं सर्व लहान ( ? ) थोरांना दाढी राखण्याविषयीं कळकळीचा उपदेश करि तात. त्यांच्या गांवांत हिंदु व मुसलमान या दोघांचीहि वस्ती असून एकदां कांहीं क्षुल्लक कारणानें त्यांच्यांत तेढ उत्पन्न झाली आणि शेवटीं मुसलमान गुंडांनीं हिंदूंना चांगला चोप देण्याचा बेत केला. आणि एक दिवस कांहीं-

तरी क्षुल्लक कुरापत काढून मुसलमानांतील गुंडांनीं मारामारीस सुरुवातही केली. मुसलमान निष्कारण मारपीट करीत आहेत, हें ऐकून कांहीं धैर्यवान हिंदु, बायकामुलांच्या संरक्षणार्थ घराबाहेर पडले. अर्थात् पुंड्यांसारखा वीर अशा प्रसंगीं घरांत बसणें शक्यच नव्हतें. ते तडक बाहेर तर पडलेच, पण एकदम पुढें न जातां ते पिछाडीसच उभे राहून ' रिझर्व्ह ' सैन्यांत दाखल झाले !

पण काय कर्मभोग सांगावा ! दोन चार मुसलमान गुंड काठ्या घेऊन या जमावाच्या पिछाडीवरच धांवून आले आणि हिंदूंचे पिछाडीचे वीर शिस्तीनें पळूं लागले ! मागच्या बाजूनें येऊन दे. भ. पुंड्यांच्या डोक्या-वरहि एका गुंडानें काठी उगारली. पण पुंड्यांनीं मागें वळून पहातांच त्याचा हात जागच्या जागींच थंड झाला ! पुंड्यांची ती प्रचंड दाढी पाहून, हा हिंदु नसून, आपल्याप्रमाणेंच अल्लाभक्त असावा, असें त्याला वाटलें आणि ' भाई माफ करो ' असें ह्मणून तो दुसरीकडे निघून गेला ! पुंड्यां-नींहि आपल्या दाढीवरून हात फिरवीत एकदां हास्यवदन केलें आणि तडक घराचा रस्ता सुधारला ! दाढीचें खरें महत्व आज त्यांच्या डोक्यांत पक्कें शिरलें. आणि ' मिया मूठभर आणि दाढी हातभर, ' या ह्मणीचा खरा अर्थ आज त्यांच्या पुरा ध्यानांत आला ! व्यवहारशून्य लोक या ह्मणीचा अर्थ कसाहि करोत; पण पुंडे यांच्या मतें, ' मिया मूठभर असला तरी चिंता नाहीं; पण त्याची दाढी मात्र निदान हातभर तरी लांब असली पाहिजे ! ' असा या ह्मणीचा अर्थ केला पाहिजे ! भाषाशास्त्रकोविद पुंड्यांच्या या ह्मणण्याचा विचार करतील, अशी आह्मांला आशा आहे !

---

# हवापालट.

कांहीं माणसें अगदीं एकमार्गी असतात. त्यांच्या आयुष्याची गाडी अगदीं ठरलेल्या रस्त्यानें आणि ठरलेल्या चाकोरीतूनच आपला मार्ग काढीत असते. आमचे बन्याबापू हे अशापैकीच एक गृहस्थ होते. ते मुंबईस रोजगारी बनून आज नाहीं म्हटलें तरी दहा वर्षे होऊन गेलीं. पण त्यांच्या चोवीस तासांच्या कार्यक्रमांत कधींही फेरबदल झालेला कोणाच्या पहाण्यांत नाहीं. त्यांनी मुंबईस आल्यावर मुगभाटांत उडद्याच्या चाळींत जे आपलें बिऱ्हाड एकदां ठोकलें, तें आजतागायत त्याच ठिकाणीं आणि त्याच स्थितींत विराजत आहे. त्यांच्या विचारांत, त्यांच्या आचारांत, घरांत आणि घराबाहेर अजूनपर्यंत कोणताही महत्वाचा फेरफार त्यांनीं आपण होऊन केलेला नाहीं. उंदीर, झुरळें, कोळी, वगैरे चळवळ्या आणि रिकामटेंकड्या प्राण्यांनीं त्यांच्या त्या साडेतीन हात लांबीच्या बिऱ्हाडांत कांहीं फेरफार स्वयंस्फूर्तीनें केले होते. उदाहरणार्थ, कोळ्यांनीं बन्याबापूंच्या खोलीच्या एकुलत्या एक खिडकींत गजांच्या आधारानें, आपल्या कोळीष्टकांचें जाळें विणून त्याचें छानदार तोरण उभारलें होतें ! भिंतींच्या कोंपऱ्यांतून, पुष्कळ हौशी व होतकरू उंदरांनीं कोरीव लेणीं खोदण्याचा प्रयत्न केलेला होता. आणि बुरसलेल्या भिंतीवर झुरळांनीं ठिकठिकाणीं आपलीं अंडीं चिकटवून खोलीला शोभा आणली होती. पण अशा तऱ्हेचे कांहीं फेरफार या प्राण्यांनीं केले असले तरी त्याची जबाबदारी बिचाऱ्या बन्याबापूंवर कशी टाकतां येईल ?

सुदैवानें बन्याबापू रहात असलेल्या चाळीचा मालकही त्यांच्याच बाण्याचा होता. त्यानें ती चाळ बांधल्यापासून आजतागायत तिच्याकडे ढुंकूनही पाहिलें नव्हतें. त्याचें दर्शनही चाळींत राहणाऱ्या प्राण्यांना कधीं घडत नसे. आपल्या चाळीचा मालक जपानी आहे कीं मंगोलियन आहे याचीही दाद बन्याबापूंना नव्हती ! अर्थात चाळीचें नुसतें दर्शन देखील

न घेणारा मालक तिची दुरुस्ती आणि व्यवस्था किती ठेवीत असेल, हें सांगायला नकोच.

अशा रीतीनें आमच्या बन्याबापूंचा जीवनक्रम अबाधित चाललेला होता. आणि यापुढेंही तो तसाच चालला असता. पण त्यांच्या प्रकृतीनें त्यांना दगा दिल्यामुळें, एक दिवस त्यांच्यावर हवा पालटण्याचें गंडांतर येऊन ठेपलें ! आधींच मुंबईची हवा. त्यांत, बन्याबापूंची दिवसा देखील सूर्यदर्शन होणार नाही अशा बंदोबस्ताची, आकुंचित, आणि एकुलती एक अशी बिऱ्हाडाची खोली ! अशा स्थितींत एखादा गलेलठ्ठ माणूससुद्धां निकालांत निघायचा ! मग बन्याबापूसारख्या सामान्य प्रकृतीच्या माणसाची प्रकृति ढांसळल्यास त्यांत आश्चर्य कसलें ?

प्रथम प्रथम बन्याबापूंनीसुद्धां आपल्या प्रकृतीच्या कुरकुरीला दाद दिली नाही. परंतु अलीकडे मलेरियानें पछाडल्यामुळें त्यांना रजा घेऊन वारंवार अंथरुण धरावें लागे. प्रथम प्रथम ते डाक्टराचें औषध घेत असत. पण डॉक्टरचें बिल पगाराच्याही वर जाणार असें त्यांच्या नजरेस आल्या-वरून पुढें काय करावें हाही त्यांना पेंचच पडला होता ! अशा परिस्थितींत बापू डोक्यावर पांघरुण घेऊन विचार करीत पडले असतां रखमाकाकू— त्यांचें कुटुंब—ओरडून म्हणाल्या—“ इश्श ! हें काय ? तो डोस घ्यायचा नाहीं वाटतें ? ”

“ जळोत ते डोस ! ” बन्याबापू आपल्या अंगावरील झुरळ झाडीत म्हणाले. “ एकसारखे डोस आणि पुड्या ! गुणाच्या नांवानें मात्र आंवळ्याएवढें. ”

“ अशानींच गुण येत नाहीं. मुळीं औषधच घेतलें नाहीं, तर...” रखमाकाकू बोलूं लागल्या. पण त्यांचें पुढचें बोलणेंच मुळीं बापूंना ऐकायला येईना ! कारण खोलीच्या बाहेर पावणेदोन फूट रुंदीच्या व चाळभर लांबीच्या व्हरांड्यावर प्रचंड आरडाओरड चालली होती ! त्या टीचभर व्हरांड्यांत पोरांचा ‘ बॅटबोल ’ चा खेळ आणि त्यांतील भांडणें जोराजोरानें

चाललीं होतीं. त्यांतच, प्रत्येक खोलीच्या दारापुढं बायकांचे थवे बसलेले असून, त्यांच्या गोष्टी, बारक्या पोरांवरील त्यांचीं खेंकसणीं, आणि पोरांचीं सप्तम सुरांतली रडणी चाललेलीं होतीं. बेकार मांजरांचीं घनघोर भांडणें त्याच व्हरांड्यांत रंगांत आलेलीं होतीं! शिवाय, त्या ग्यालरीला ऊर्फ व्हरांड्याला लागून असलेल्या टीचभर बोळांत अनेक फेरीवाल्यांनीं नुसती बोंबाबोंब उडवून दिली होती! आणि एवढी कटकट बन्याबापूंना कमी होईल म्हणूनच कीं काय, शेजारचं एक बाळ त्यांच्या खोलीच्या अगदी दाराशींच, एक रिकामा राकेलचा डबा जोराजोरानें बडवून आपल्या निमुकल्या जिवाला रंजवित होतें! तेव्हां एवढ्या रणधुमाळीपुढं रखमाकाकूंचें बोलणें—जरी त्या त्यांच्या जवळच उभ्या राहून बोलत असल्या—तरी त्यांना कसें ऐकूं येणार?

" जळो ही मुंबई! काय शिंच्यांनी बाजार मांडला आहे! या कल-कलाटापुढं तुझें एक अक्षर देखील मला ऐकूं येत नाहीं. काय म्हणतेस तूं?" बन्याबापू त्रासून ह्मणाले.

" म्हटलें, औषध घेतल्यावांचून गुण कसा येईल?"

" आणि औषधें खाऊन तरी कुठे गुणाचा उजेड पडतो आहे? या मुंबईच्या भिकारी हवेंत सगळा दवाखाना कुणाला पाजला, तरी गुण नाहीं यायचा!"

" डॉक्टर काय ह्मणतो?"

" कपाळ ह्मणतो तुझें डॉक्टर!" बापू वैतागून म्हणाले, " अग, हे डॉक्टर लोक कोयनेलानें बाटल्या भरतात, आणि आमच्या हातांत देतात. संपलें त्यांचें काम! महिनोमहिने रखडून एखाद्या रोग्यानें गुण येत नाहीं म्हणून कुरकूर केलीच, तर त्याला हवा पालटायला जा म्हणून सांगतात!"

" खरेंच बाई! मी सुद्धां आपल्याला तेंच सुचवणार होत्यें! आज दहा अकरा वर्षें आपण जें या कोंदट चाळींत माडून घेतलें आहे, त्यामु-

ळेंच हे ताप नी बीप येतात एकसारखे. तेंच जर या उन्हाळ्याच्या दिवसांत कुठे जरा हवेवर गेलें, तर...... ”

“ लवकरच मरायला होईल ! ” बापू मध्येंच म्हणाले.

“ इश्श ! हीं बोलणीं शोभतात का तरी ? हवापालट करून का कुणी कुठे मेलें आहे ? ”

“ मला वाटतें, खूळ लागलें आहे तुला ! लोकांनीं सरी घातली, म्हणून आपण काय दोरीचा फांस लावून घ्यायचा आहे गळयाला ? हवापालट करणें हें पैसेवाल्यांचें काम. नुसत्या जागेलाच ओंजळभर रुपये लागतील ! ”

“ कांहीं नाहीं लागत ! ” रखमाकाकू मान उडवीत म्हणाल्या “ आपल्या चाळीचा भय्या म्हणत होता, कीं लोणावळ्याला फुकट जागा मिळते...”

“ नुसत्या गप्पा पुष्कळ सांगतां येतात. देणार आहे का तो रामशरण तुला जागा मिळवून ? आणि त्यानें दिली, तरी आपल्याला कांहीं जायचें नाहीं ! आपण दोघेंही विसराळू आणि मी हा असा माथेफिरू अन् तूं सगळ्या गांवाची भित्री ! शिवाय बरोबर पोरांच्या ब्याद्दी ! हाडास कांत लागेल ! आहेस कुठे ! ”

पण यावर रखमाकाकूंनीं असें अकांडतांडव केलें, कीं शेवटीं बापूंना, जागा मिळाल्यास लोणावळ्यास जाण्याचें कबूल करावें लागलें.

आमचे बापू हवा पालटण्याच्या जे इतके विरुद्ध होते, त्याचें कारण, हवा पालटणें हें अतिशय खर्चाचें काम आहे, हें तर होतेंच, पण शिवाय प्रवास म्हटला, कीं त्यांचे पोटांत एकदम मोठा थोरला गोळा उभा राही. एक तर त्यांनीं कोठें फारसा प्रवासच केला नव्हता. कोकणांतून ते बोटीनें मुंबईस आले, यापलीकडे त्यांनीं क्वचितच प्रवास केला असेल. त्यामुळें स्वतःच्या जबाबदारीवर सतरा बोचकीं, पोरें, आणि बायको यांसह प्रवास करणें, हें हिमालयाच्या एव्हरेस्ट शिखरावर जाण्याइतकेंच त्यांना अवघड आणि जिवावरचें काम वाटत होतें ! प्रथम, लोणावळ्याला फुकट जागा कसची मिळते, या भरंव-

शावरच ते जवळ जवळ निश्चिंत होते. पण त्यांचे पापग्रह जोरावर असल्या-मुळेंच कीं काय, तें जागेचें अशक्य वाटणारें कंत्राट अचानक जुळून आलें. लोणावळ्याला टिकमदास भिकमदास यांच्या सॅनिटोरियम ऊर्फ धर्मशाळेव-रील रखवालदार खुदाबक्ष हा बापूंच्या चाळीचा भय्या जो रामशरण, याचा गांववाला होता! त्यामुळें त्याचे वशिल्यानें बापूंचा जागेचा अर्ज मंजूर होऊन, त्यांच्या नांवावर एक महिन्यापुरता त्यांना एक गाळा मिळण्याचें मुक्रर झालें. वरील बातमी ऐकून रखमाकाकूंचा आनंद त्रिभुवनांत माईनासा झाला. पण बन्याबापूंचें तोंड मात्र चिमणीएवढें झालें!

" ऐकलें का? म्हटलें, जमायचें असलें म्हणजे असें जमतें!" रखमाकाकू म्हणाल्या.

" होय!" बन्याबापू दीर्घश्वास टाकून म्हणाले. " नशिबांत असेल, तें टळायचें नाहीं!"

" शर्थ आहे आपल्यापुढें!" रखमाकाकू म्हणाल्या. त्यांना नवऱ्याची आणखीही पुष्कळ खरडपट्टी काढायची होती. पण आतां जाण्याची तयारी करायची असल्यामुळें त्यांच्याशीं भांडत बसायला त्यांना वेळ नव्हता! त्या परक्या मुलखांत कांहीं मिळायचें नाहीं, म्हणून सांडगे, कुरडया, पापड, मेतकूट, भाजणी—एक ना दोन, हजारों जिन्नस त्यांना करायचे होते. आतां त्या याच उद्योगांत सगळा दिवस चूर असत. बापूंना कांहीं या गोष्टींकडे पहाण्याचें कारण नव्हतें. त्यांच्यापुढें रजा, आणि पैसे एवढे दोनच महत्वाचे मुद्दे होते. पैकीं रजा तर मिळाली. पैसे ही कांहीं मिळण्याची चीज नव्हे! म्हणून त्यांनीं आपलें बँकबुक झाडून त्यांतून जेवढे रुपये—आणे—पै निघाले, तेवढ्यांची पुरचुंडी खिशांत टाकली. बिचाऱ्या बन्याबापूंना पगार कांहीं मोठा नव्हता. विमाफंड, प्राव्हिडंटफंड वगैरे फंडगुंडांच्या तावडींतून अखेर ४९ रु. १३ आणे २ पै त्यांचे हातीं लागे. एवढ्या प्रचंड रकमेंतून मुंबईचा खर्च भागवून बिचाऱ्या-जवळ शिल्लक ती काय रहाणार? त्यांच्या बँकबुकांत किती रक्कम होती

हें जरी आम्हांस माहीत असलें तरी पोस्टाच्या नियमाप्रमाणें आम्हांला तें जाहीर करतां येत नाहीं !

असो. शेवटीं एकदां जाण्याचा दिवस उजाडला ! बोचकीं बांधून जय्यत तयारी झाली. प्रपंचास लागणारें बहुतेक सामान बरोबर घेतलें आहे, असें काकूंनीं छातीला हात लावून सांगितलें. रखमाकाकू, थोरली ( सहा वर्षांची ) चिंगी, आणि धाकटा दोन वर्षांचा बाबू, ही सगळी मंडळी जय्यत तयार झाली. बापूंनीं सामानाचे बोजे मोजले. ते सात भरले ! त्यांत त्यांनीं माणसांची संख्या ( स्वतःसह ) मिळविली आणि एकंदर अकरा नग आहेत, असें आपल्या स्मरणवहींत लिहून ठेवलें ! गाडी ठरविली आणि हे स्थावर व जंगम मिळून अकराचे अकरा नग परत सुखरूप या उडद्याचे चाळींत येवोत, अशी कांदेवाडींतल्या मारुतीची प्रार्थना करून बापू गाडींत बसले.

बापूंच्या घड्याळाप्रमाणें ते अगदीं लवकरच स्टेशनवर रवाना झाले होते. परंतु बापू पहातात, तों आपली गाडी अगदी सुटण्याच्या तयारींत प्लॅटफॉर्मवर उभी आहे ! मग त्या धांदलीला काय विचारतां ? आणीबाणीचीच वेळ ती ! पण बापू डगमगले नाहींत. त्यांनीं आपलें धोतर वर खोंचलें, वहाणा काढून डाव्या हातांत घेतल्या, आणि धांव मारून तिकिटें आणलीं. चटकन दोन हमालांच्या डोक्यावर ते बोजे चढविले, पाठोंगळीस चिंगीला घेतली, आणि ‘ दोडा ’ म्हणून काकूंना सांगून त्यांनीं प्लॅटफॉर्मकडे धूम ठोकली ! खांद्यावर फराळाच्या सामानाचा झोळणा, आणि कडेवर बाबूला घेऊन रखमाकाकूंनींही आपल्या शक्तीप्रमाणें बापूंचें अनुकरण केलें ! आणि मंडळी गाडीपाशीं आली. गाडींत तर काय, गर्दीचा नुसता कहर उसळला होता. आणि गुळाला जशा माशा चिकटतात, तशीं त्या गाडीला आंतून बाहेरून माणसें चिकटलीं होतीं ! ज्या ज्या दाराशीं ही मंडळी जात, तेथें तेथें ‘ जागा नाहीं ’ म्हणून आंतले लोक ओरडत. दार तर कोणीच उघडीना. शेवटीं हमा-

त्यांनीं खिडकींतूनच ते बोजे आंत टाकले. आणि कशा तरी सेतीनें बापूही सहकुटुंब सहपरिवार गाडींत शिरले. गाडींत जागा न मिळाल्यामुळें सभोंवती सामानाचा कोट रचून आणि चिंगीला पाठीवर घेऊन बापूंना उभेंच रहावें लागलें ! पण अखेर गाडी साधली, एवढेंच त्यांना दुःखांत सुख वाटत होतें.

गाडी थेट कल्याणला जाऊन उभी राहिली. आणि मग मात्र डब्यांतली दोन माणसें खालीं उतरल्यामुळें बापूंना जरा टेंकायला तळहाताएवढी जागा मिळाली. इतक्यांत एका उतारूनें "गाडी नाशीकला केव्हां हो पोंचेल ?" अशी दुसऱ्यास पृच्छा केली. त्याबरोबर बन्याबापू एकदम घाबरून उभे राहिले ! बापूंनीं जरी प्रवास फारसा केलेला नसला, तरी लोणावळ्यास जातांना नाशीक लागत नाहीं, हें त्यांनीं भूगोलांत पाठ केलेलें होतें. त्यामुळें कांहीं तरी घोंटाळा झाला असला पाहिजे, असा त्यांनीं कयास केला. आणि शोधाअंतीं आपण घाईघाईनें पूना एक्स्प्रेसऐवजीं नागपूर मेलमध्येंच बसलों आहों असें त्यांना आढळून आलें !

सदरहू गोष्ट लक्षांत आल्याबरोबर बापूंनीं ताडकन खिडकीतून खाली प्लॅटफॉर्मवर उडी टाकली. आणि काकूंना खालीं उतरण्याबद्दल ओरडून सांगत असतां त्यांनीं चिंगी आणि बाबू यांच्या बकोटया धरून त्यांना खालीं खेंचलें ! आणि 'हमाल, हमाल' असें जोराजोरानें पुकारीत ते सगळ्या प्लॅटफॉर्मवर उघडे बोडके धांवत सुटले !

हमालांनीं भराभर बोजे बाहेर काढले आणि डाव्या हातांतला बाबू मोठमोठ्यानें रडत असतां उजव्या हातानें बापू नग मोजूं लागले—"एक, दोन, तीन, चार, पांच, सहा, सात, आठ, नऊ, दहा आणि (स्वतःच्या छातीवर बोट ठेवून) अकरा ! बस्स ! नग बरोबर ! चला !"

बापूंनीं नग मोजले खरे, पण त्यांत एक मोठीच घोडचूक,—नव्हे गाढवचूक झाली होती ! कारण गाडींतून उतरतांना भांबावून जाऊन त्यांनीं

बाबूच्या ऐवजीं दुसऱ्याच एका लहान पोराला बकोटी धरून खालीं खेंचलें होतें !! म्हणून तें पोर रडत होतें, आणि इकडे डब्यांत त्यांचा खरा बाबू खड्या सुरांत आक्रोश करीत होता ! तेव्हां बापूंनीं जेव्हां ' नग बरोबर आहेत ' असें म्हटलें, तेव्हां डब्यांतला एक गृहस्थ बापूंना ह्मणाला—"अहो बृहस्पति ! तुमच्या हातांतला मुलगा माझा आहे ! तुमचा मुलगा हा इकडे आंत शंख करतो आहे !" त्याबरोबर बापू एकदम उडी मारून म्हणतात—

" आं ! "

असो. अशा रीतीनें बापूंनीं एकदांची ती गाडी सोडली. पूना एक्स्प्रेस कल्याणला आल्यावर त्यांत ते बसले. आणि संध्याकाळचे वेळीं एकदांचे ते आपल्या ठरलेल्या जागीं आले. ते त्या धर्मशाळेशीं आले, तेव्हां जवळ जवळ दिसेनासेंच झालें होतें. ती धर्मशाळा गांवाच्या साधारण बाहेरच असल्यामुळें आणि तींत वस्तीही फारशी नसल्यामुळें ती ओसाड आणि भयाण दिसत होती ! खुदाबक्षानें त्यांची कोठडी उघडून दिली आणि पान तंबाखूसाठीं एक रुपया त्याचे हातावर ठेवून बापूंनीं त्या आपल्या नियोजित कोठडींत प्रवेश केला !

बोलून चालून धर्मार्थ जागाच ती, मग तेथली व्यवस्था काय पुसावी ? त्या खोलींत गुडघाभर केर सांचलेला होता. जिकडे तिकडे कोळीष्टकें माजलीं होतीं. बाहेर रातकिडे ओरडत होते आणि खोलींत वटवाघळें फडफडत होतीं. वारा सोसाट्याचा सुटला होता. आणि खिडक्यांच्या तुटक्या फळ्या थडाथड आपटत होत्या. बिचारे बापू ! प्रवासाच्या धांवपळीनें पक्के मेटाकुटीस आल्यामुळें त्या कचऱ्यांतच आणि त्या अंधारांतच त्यांनीं एकदम बैठक मारली !

" इश्श ! हें काय ? कंदील देखील लावायचा नाहीं वाटतें ? " रखमाकाकू म्हणाल्या.

" बोचक्यांतील कंदील बाहेर काढ, म्हणजे लावतों. तीं बोचकीं धुंडाळायला मला तर आतां बिलकूल त्राण नाहीं बुवा ! " बापू त्या कच-

त्यांतच आडवे होत म्हणाले. बन्याबापू दमले होते तशा रखमाकाकूही दमलेल्याच होत्या. पण हवा पालटण्याचा बूट त्यांनींच काढलेला असल्यामुळें आणि स्त्रीजात जात्याच कष्टाळू असल्यामुळें त्यांनीं न कुरकुरतां ती बोचकीं अंधारांतच धुंडाळून त्यांतून कंदील बाहेर काढला. पण काय कर्म सांगावें, वाटेंत सतरा वेळां झालेल्या सामानाच्या चढउतरीमुळें कंदिलाची कांच फुटून तिचा नुसता चुरा झाला होता !

" ऐकलें का ? म्हटलें कंदिलाची कांच फुटून गेली आहे. आणि बर्नरही पार वांकडा झाला आहे ! तेवढी कांच जाऊन आणली पाहिजे ! "

" छेः ! मला तर उभेंसुद्धां राहावत नाहीं ! नसेना का आजचा दिवस दिवा ? बघूं मग उद्यां कांचेचें ! "

" भलतेंच ! परका मुलूख आणि दिव्याशिवाय कशी रात्र काढायची ? आणि आतां फराळ तरी कसा करायचा या अंधारांत ?"

झालें ! कुरकुरत आणि पुटपुटत बापू उठले आणि ढकलत ढकलत बाजाराकडे गेले ! चांगलें अर्धा मैल चालल्यावर त्यांना एक मुसलमानाचें मोडकें तोडकें दुकान आढळलें. पण त्याच्याकडे कंदिलाची कांच नव्हती. गंडेरीवाल्यांजवळ आणि फिरत्या चिवडेवाल्यांजवळ जसल्या जस्ती दिवल्या असतात, त्या नमुन्याची रॉकेलची टिनपाटें मात्र त्याच्याकडे होतीं ! शेवटीं नाइलाजास्तव त्यांतलेंच एक खरेदी करून नेण्याचें बापूंनीं ठरविलें !

" याची काय किंमत ?"

" साडेसात आणे !"

" आं ! मुंबईस तर असलीं टमरेलें दोनदोन आण्यांना मिळतात."

" मग मुंबईहूनच आणा तात्या ! " इस्माइलशेट हंसत म्हणाला !

जास्त बोलण्यांत हांशील नाही असें ठरवून बापूंनी तसली एक दिवटी खरेदी केली. आणि ती पेटवून घेऊन बापू आपल्या निवासस्थानाकडे परतले ! खोलींत दिवा आल्यावर आंतील कचरा पाहून काकू म्हणाल्या " आधीं इथला केर काढला पाहिजे. पण केरसुणी तरी कुठें आहे ? "

" हें बघ ! " बापू त्रासून म्हणाले, " आतां आधीं फराळाचें काढ. आम्हांला चार घांस खाऊं दे. मग जगलों, वाचलों म्हणजे उद्यां केरसुण्या आणीन आणि खराटेही आणीन ! "

रखमाकाकू यावर जास्त बोलल्या नाहींत. पोरेंही भुकेनें वेंगलींच होती. तेव्हां त्यांनीं पण झटपट करून, आणि खोलीच्या मधली थोडीशी जागा झटकून, मध्यें ती बापूंनीं आणलेली दिवटी ठेवून दिली आणि फराळाचा झोळणा घेऊन त्या बसल्या. त्यांच्या दोहों बाजूंला चिंगी आणि बाबू बसलीं. आणि समोर जेठा मारून बापू बसले. सगळ्यांचें लक्ष झोळण्याकडे लागलें होतें. बापू मात्र त्या मशालवजा दिवटींतून जो काळ्या धुराचा लोट वर चालला होता, त्याच्याकडे शून्य दृष्टीनें बघत बसले होते !

झोळण्याची गांठ सोडीत असतांना काकू यजमानांना उद्देशून म्हणाल्या— " तेव्हां म्हणायचें होतें, कीं अमूक कशाला करत्येस आणि तमूक कशाला करत्येस. पण आतां चार प्रकारचे रुचकर पदार्थ पोटांत गेले, म्हणजे तेवढी अधिक हुषारी नाहीं का यायची माणसाला ? "

वरील उद्गार काढून काकूंनीं तो झोळणा सोडून पालथा केला, तों त्यांतून लाडू, चिवडा वगैरेंच्या ऐवजीं बिबवे, फण्या, पोतीचे मणी, वाकाच्या दोऱ्या, नाना प्रकारच्या खापऱ्या आणि कांहीं वाळलेल्या मुळ्या, असल्या चिजा भराभर बाहेर पडल्या ! ! त्या चिजा पाहून पोरें घाबरलीं ! आणि बापू तर बेंबीच्या देंठापासून हंसूं लागले !

बिचाऱ्या काकूंना या गारुडाचा कांहींच थांग लागेना. पण बापूंनीं त्याचा लवकरच शोध लावला. लोणावळ्याला बापूंनीं सामान खालीं उतरून ठेवलें, तेथेंच,—प्लॅटफॉर्मवर, एक नाकाडोळ्याची वैदीण आपल्या झोळण्यासह निजलेली होती. तेथून सामान इकडे आणतांना धांदलींत तिचा झोळणा यांच्या सामानांत येऊन, यांचा फराळाचा झोळणा तिचेजवळ राहिला असावा ! बापूंनीं नग मोजले, तेव्हां हा घोंटाळा उमगणें शक्यच नव्हतें !



काकूंनीं तो झोळणा पालथा केला, तों त्यांतून लाडू, चिवडा वगैरेंच्या ऐवजीं बिबवे, फण्या, पोतीचे मणी, वाकाच्या दोऱ्या, नाना प्रकारच्या खापऱ्या, आणि कांहीं वाळलेल्या मुळ्या, असल्या चिजा भराभर बाहेर पडल्या!"

सगळें खरें. पण पुढें काय ? पोरें तर भुकेमुळें रडायलासुद्धां लागलीं ! भुकेला कोंडासुद्धां चालतो म्हणतात. पण भुकेला बिवे आणि फण्या कांहीं खास चालत नाहींत ! एकवेळ बापू तसेच निजले असते. पण पोरांची वाट काय ? बिचारे बापू आपल्या कर्माला हात लावून पुन्हां उठून बाजारांत गेले आणि शिळेपाके मिळतील तसले चणे कुरमुरे आणून ते त्यांनीं आणि पोरांनीं भक्षण केले ! काकूंना असलें बाजारांतलें चालत नसल्यामुळें त्या तशाच—वाटीभर पाणी पिऊन—आडव्या झाल्या ! हायरे हवापालट !

असो. नित्यनियमाप्रमाणें रात्र संपली, आणि दिवस उजाडला, तेव्हां ही आमची मंडळीही जागी झाली. त्या घाटमाथ्यावरील हवेंत चांगला थंडपणा आणि तरतरी होती. पण ही सर्व मंडळी मात्र अगदींच मलूल आणि थकलेली दिसत होती ! दिवसभर झालेली प्रवासाची दगदग, खाण्यापिण्याचे हाल, रात्रभर मोडक्या खिडक्यांतून आंत घुसणारी वादळी हवा, इत्यादि कारणांनीं या कुटुंबांत कोणाचेच तोंडावर टवटवी दिसत नव्हती. बापूंची तर कंबरच जणूं मोडली होती ! चिंगी खोकत होती. बाबू शिंकत होता. आणि बिचाऱ्या काकू डोकें दुखत असल्यामुळें कपाळाला चिंधी बांधून कशाबशा हळूहळू फिरत होत्या !

" उठायचें नाहीं का ?" काकू बापूंना म्हणाल्या.

" छे: ! ह्या हवापालटानें मी अगदीं जमीनदोस्त झालों आहें ! " बापू पांघरूण सरसावीत ह्मणाले.

" कांहीं तरी सोंग करून माझ्या डोक्यावर खापर फोडायचें. दुसरें काय ? "

" असा त्रागा करूं नको. हा उठलों ! काय करूं ? "

" काय करूं म्हणजे ? काय एक काम आहे ? हा ढोंपरभर केर पडला आहे, तो काढायला केरसुणी पाहिजे. एक टमरेल पण आणा. शिवाय इथें एकदेखील खुंटी नाहीं. तेव्हां कांहीं खिळे पण पाहिजेत. शिवाय लोणी, पाण्याला एक बादली, कांहीं भाजी,... "

" पुरे पुरे ! " बापू कपाळाला हात लावीत मध्येंच ओरडून म्हणाले. " ही यादी ऐकूनच माझी कंबर मोडून गेली आहे ! पण हें बघ, भुकेनें आणि तहानेनें डोळ्यांत प्राण आले आहेत ! तेव्हां अगोदर घोटभर चहा मिळेल तर ही यादी ऐकण्यापुरतें तरी मला बळ येईल ! "

" पण चहा झाला तरी काय मंत्रानें होतो ? उठा ! आणि कुठून तरी दूध पैदा करून आणा ! "

एक रिकामें भांडें घेऊन बापू दुधाच्या मोहिमेवर निघाले. आणि आठ आणे शेर भावाचें पाणीदार दूध मोठ्या मिनतवारीनें पैदा करून विजयी वीराप्रमाणें बापूंनीं गृहप्रवेश केला ! काकू स्टोव्ह पेटविण्याच्या उद्योगाला लागल्या. आणि बाकीची मंडळी आशाळभूतपणानें स्टोवभोंवतीं कडें करून बसली. पण कांहीं केल्या तो पेटेचना ! शेवटीं पिन केली पाहिजे असें ठरवून बापू पिन शोधूं लागले. पण पिनचा पत्ता नाहीं. बापूंनीं सगळें सामान त्या खोलीभर पेरून त्यांत ते पिन पाहूं लागले. पण पत्ता नाहीं. शेवटीं पिन आणायला कोण विसरलें यावरच अर्धी घटका कडाक्याचा वाद झाला ! आणि मग तो स्टोव्ह रागानें जमिनीवर खूप जोरानें आदळून, बापू निराशेमुळें स्वस्थ आडवे पडले !

इकडे पोरें ' चहा, चहा, ' करून थैमान घालूं लागलीं. आणि काकूंनीं संतापून त्यांना चापट दिल्यावर तर त्यांनीं एकच हलकल्होळ उडवून दिला ! नऊ वाजून गेले, तरी चहाचा ठिकाण नव्हता ! तेव्हां बन्याबापू मुकाट्यानें बाहेर पडले आणि एक लांकडाची मोळी घेऊन आले. बाहेर रस्त्यावर जाऊन तीन दगड उरापोटावरून त्यांनीं आणले आणि त्यांची चूल बनविली. मग काकूंनीं विस्तव पेटविण्यास सुरवात केली. लांकडें ओलसर असल्यामुळें तीं पेटण्याखालीं आणखी एक तास गेला. आणि शेवटीं अकरा वाजतां त्या मंडळीचे पोटांत एकदांचा चहा गेला !

नंतर बापू पुन्हां बाजारांत गेले आणि आवश्यक असलेलें सामान त्यांनीं खरेदी करून आणलें. बाजार बराच लांब आणि शिवाय कालचा

झालेला एकंदर जबर त्रास, याचे योगानें बापू पक्केच मेटाकुटीस आले होते. पण करतात काय ? तशाच तंगड्या ओढीत होते !

सामान एक वाजतां घरांत आलें आणि तीन बाजतां पिठलेंभात सर्वांच्या पोटांत गेला ! पण तो जसा गेला, तसाच बापूंन्या पोटांतून तो थोडक्याच वेळांत बाहेरही पडला ! बापूंना लोणकढें तूप खाण्याची मुंबईची संवय. पण येथें कांहीं लोणी मिळेना. शेवटीं बापूंनीं घेलाचंद मारवाड्याकडून कसलेंसें तूप आणलें. आणि त्या तुपाच्या स्वादिष्ट वासानें बापूंना जेवल्यावर लगेच उलटी झाली !

असो. थोडी वामकुक्षी केल्यावर बापू एकदां आपल्या इमारतींत कोण कोण लोक राहातात व त्यांची हालहवाल कशी काय आहे, तें पाहण्याकरितां बाहेर पडले. तळमजल्यावर दोन बिऱ्हाडें हवा खाण्याकरितां आलेलीं असून, एकांतील माणसें बाहेर फिरायला गेलेलीं होतीं. दुसरें बिऱ्हाड एका मारवाड्याचें होतें. चंदुलालशेट आपल्या लंबोदरावरून हात फिरवीत बाहेरच बसले होते. जवळ भरपूर पैसा व एक नोकरही असल्यामुळें शेटजींना हवा एकंदरींत बरी वाटत होती ! बोलतां बोलतां ते म्हणाले—" खालच्यापेक्षां वरची जागा जास्त हवेशीर. पण तुमचे खोलीचें दार खिळखिळें झालेलें असल्यामुळें जरा भीति वाटते ! हो,—ही इमारत गांवाबाहेर असल्यामुळें चोराचिलटांचें भय ! दुसरें काय ? "

रात्रीं ही हकीगत बापूंनी रखमाकाकूंना सांगितली. त्याबरोबर त्यांचें धाबें दणाणून गेलें ! बापू म्हणाले, आपल्या जवळ आहे काय ? पण काकूंना तें पटेना. त्यांच्या हातांतल्या पाटल्या आणि चिंगीच्या अंगावरचें किडूकमिडूक चोर पळवीत आहेत, असा देखावा त्यांच्या डोळ्यांसमोर दिसूं लागला ! आणि रात्रीं आळीपाळीनें एकेकानें जागत बसायचें, असें त्यांनीं ठरविलें ! " दिवसा अन्न नाहीं आणि रात्रीं झोप नाहीं ! वारे हवापालट ! " बन्याबापू उद्गारले.

रात्रीं बारा वाजेपर्यंत बापूंनीं जागावें आणि पुढें काकूंनीं पहारा करावा, असें ठरलें होतें. त्याप्रमाणें बारा वाजल्याबरोबर बापूंनीं बायकोला उठवून

आपण अंथरुणावर अंग टाकलें. पण त्यांना झोंप लागते न लागते तोंच काकूंनीं त्यांना घाबऱ्या घाबऱ्या उठविलें ! !

" अग काय ?" बापू डोकें फिरवून म्हणाले.

" ऐकलें का ? " काकू भेदरून जाऊन म्हणाल्या. " कुत्रें केवढ्या मोठ्यानें भुंकतें आहे तें ? "

" मग ? तें भुंकलें तर तुझें काय जातें ?"

" म्हणजे काय ? अशा अपरात्रीं कुत्रें उगीच कसें भुंकेल ? आणि पाहिलें का ? अगदीं आपल्या दरवाजाला खेटून उभें राहून तें भयाकारी भुंकतें आहे ! कुणीतरी समोर आल्याशिवाय कुत्रें असें मागें मागें येऊन भुंकायचें नाहीं. "

" बरें झालें ! " बापू डोक्यावरून पांघरूण घेत ह्मणाले. इतक्यांत दाराला जरा धक्काही बसला ! त्याबरोबर ' अगबाई ' असें ओरडून काकू मटकन् खालींच बसल्या !

आतां मात्र बापूंना उठणें प्राप्त झालें. एका हातांत काठी आणि दुसऱ्या हातांत कंदील अशा थाटांत लटपटणाऱ्या पायांनीं बापू दाराशीं आले आणि त्यांनीं हळूच दाराचे फटींतून बाहेर डोकावलें. मग त्यांनीं हलकेच दाराची एक फळी उघडून बाहेर एक पाऊल टाकलें. त्यांच्या पाठीशीं भयभीत झालेल्या काकू, आणि काकूंच्या कमरेला विळखा घातलेली चिंगी अशी माळची माळ दाराशीं उभी राहिली ! पण बापू बघतात तों काय ? एक काळें विद्रूप मांजर कुत्र्याच्या भयानें पाठीची कमान करून आणि सर्व केस ताठ उभारून वरच्या बाजूला उभें आहे, आणि एक कुत्रा बापूंच्या दाराशीं उभा राहून त्याच्यावर जोराजोरानें भुंकतो आहे, असा देखावा त्यांच्या नजरेस पडला !

इतका प्रकार झाल्यावर मग झोंप तरी कसची लागते ? सगळी रात्र त्यांना जागरण झालें असें ह्मणण्यास हरकत नाहीं ! पण पुढें तरी तेथें त्यांना सुख लागलें, असेंही नाहीं. रोज नवी अडचण, नवी खटपट आणि नवा खर्च ! आज काय म्हशीनें लाथ मारली, म्हणून दूधच मिळालें नाहीं.



एक काळें विद्रूप मांजर कुत्र्याच्या भयानें पाठीची कमान करून आणि सर्व केस ताठ उभारून वरच्या बाजूला उभें आहे. आणि एक कुत्रा त्याच्यावर जोराजोरानें भुंकतो आहे, असा देखावा त्यांच्या नजरेस पडला !

उद्यां काय, बाबूला तापच आला! अशा एक ना दोन, अनेक अडचणी नित्य नव्या त्यांच्यापुढें उभ्या राहात. बाजारचे सामानाची ने आण तर कधींच संपली नाहीं. बाबूला डॉक्टरचें औषध सुरू करणें भाग पडलें. आणि डॉक्टरनें सर्वांनाच रोज थोडें थोडें कोयनेल घेण्याबद्दल शिफारस केली! हवापालट केली, तरी कोयनेल कांहीं सुटलें नाहीं!

सर्वांत मुख्य अडचण, म्हणजे बापूंची पैशांची पिशवी जवळ जवळ खलास होण्याच्या पंथास लागली! त्यामुळें सबंध महिना येथें न काढतां या हालअपेष्टांतून लवकरच बाहेर पडावें असें बापूंनीं ठरविलें आणि एक दिवस बांधाबांध करून बापूंनीं त्या जागेला रामराम ठोकला! पुन्हा हमाल, पुन्हा गाड्या, घोंटाळे, आणि त्रास वगैरे सर्व समारंभ यथासांग पार पडले! त्यांतच पावसानेंही संधी साधली! पावसामुळें बोरीबंदरावर गाड्या अगदीं थोड्या असल्यामुळें बापूंना गिरगांवांत जाण्याचे चार रुपये गाडीवाले सांगूं लागले! आणि बापूंच्या जवळ तर आतां रुपया सवा रुपयाचा खुर्दा शिल्लक होता. शेवटी त्यांनी एक हमालच केला. उरलेले एक दोन बोजे स्वतःच्या डोक्यावर घेतले! आणि कसेतरी रखडत त्यांनीं एकदां आपली ती मुगभाटांतली उडद्याची चाळ गांठली!

या झालेल्या त्रासानें बापूंनीं खरोखरच दुसरे दिवशी अंथरूण धरलें. पण देवाच्या दयेनें ते आठएक दिवसांनीं हळूहळू हिंडूं फिरूं लागले! आणि शेजारचे बिऱ्हाडीं सत्यनारायणालाही हजर राहिले. "काय हो बापू, तुमचीं अशीं हाडें कशानें बाहेर पडलीं? अशी दशा होण्याचें कारण तरी काय?" एकानें प्रश्न केला.

"हवापालट!!" बापू उद्गारले. बापूंच्या या बोलण्याचें सर्वांनाच मोठें आश्चर्य वाटलें. पण बापूंनीं आपल्या हवापालटाची जेव्हां सर्व हकीगत सांगितली, तेव्हां मात्र त्या लोकांची अगदीं बालंबाल खात्री झाली. आणि एकजण म्हणालाही, कीं—"बापू, तुम्हीच म्हणून सहीसलामत परत तरी आलांत. आमच्यासारखा तर अशा स्थितींत पार खत्तम होऊन जायचा!"

---

# साहित्यभक्तांचा परिचय.

आमच्या गांवीं साहित्य परिषद् भरणार, ही बातमी ऐकल्यापासून मला अतिशय आनंद झाला होता. मला वाचनाचा नाद बराच असल्यामुळें या शब्दसंपत्तीचे ईश्वर आपल्याला प्रत्यक्ष पहायला सांपडणार, असें कळ-तांच मला कां आनंद होणार नाहीं ? शिवाय मी रहात होतों त्याच वाड्यांत राहणारे कवि श्री. गगनविहारी ( वास्तविक हे जमिनीवरूनच विहार करितांना नेहमीं दृष्टीस पडत ! ) हे स्वागताध्यक्ष असल्यामुळें तर माझ्या आनंदाला पारावारच उरला नव्हता ! पण यामुळें एक गोष्ट मात्र माझ्या अंगाशीं आली. ती ही, कीं मला स्वागत कमिटीचा चार रुपये रोख भरून प्रतिनिधि व्हावें लागलें ! वास्तविक दोन आणे भरून प्रेक्षक या नात्यानें परिषदेची मौज लुटण्याचें मी ठरविलें होतें. पण खुद्द स्वागताध्यक्षच माझे शेजारी ! तेव्हां ते मला तसा कसचे सोडतात ? मी त्यांना सांगितलें, कीं माझा तसा कांहीं वाङ्मयाशीं जवळचा संबंध नाहीं. पण ते कसचे ऐक-तात ? त्यांनीं तो संबंध मला दाखवला. आणि मलाही तो कबूल केल्यावांचून गत्यंतर नव्हतें! कारण छापील पुरावा! माझे कविमित्र श्री. पुंडे यांनीं संगीत अंकालिपी हें महत्वाचें पुस्तक प्रसिद्ध केलें होतें. आणि त्याच्या प्रस्तावनेंत, त्या पुस्तकाचीं प्रुफें विनामूल्य तपासल्याबद्दल माझें नांव जाड टाइपांत छापून आभार मानले होते ! तेव्हां तो आधार दाखवून, ' साहि-त्यभक्त ' या नात्यानें मजजवळून रोख चार रुपये स्वागताध्यक्षांनीं काढले ! एखादी क्षुल्लक गोष्ट त्यावेळीं जरी गोड वाटली, तरी परिणामीं कशी अंगाशीं येते, त्याचें हें उत्तम उदाहरण आहे !

तें कांहीं कां असेना ? पण आमच्या गांवीं साहित्य परिषद् भरणार, ही गोष्ट एकंदरींत मला अतिशय महत्वाची आणि मजेची वाटली, यांत शंका नाहीं. आणि परिषदेंत ' साहित्यभक्तांचा परिचय ' या नांवाचा जो कार्य-क्रम श्री. गगनविहारी यांनीं ठेवला होता, त्यामुळें तर विशेष मजा येणार

होती. प्रत्येक लेखकानें व कवीनें नेमलेल्या स्टुलावर उभें राहून आपलें आत्मचरित्र सांगायचें, अशी ही योजना होती. ही योजना किती कल्पनेबाहेर यशस्वी झाली, हें वाचकांना आतां समजेलच !

परिषदेची तारीख जसजशी जवळ येत चालली, तसतसे एकेक लेखक आणि कवि गांवांत चमकूं लागले. त्यांत सरळ नांवाचे कवि थोडेच असून बहुतेक साहित्यभक्तांनीं निवडक पशूंचीं आणि पक्ष्यांचीं नांवें धारण केलीं होतीं. त्यामुळें त्यांचीं नुसतीं टोपण नांवेंच माहीत असलेल्या एखाद्या भोळ्या माणसाला येथें पशुपक्ष्यांचेंच संमेलन भरणार असावें, असें वाटलें असतें !

असो. माझे एक कविमित्र सुप्रसिद्ध कवि श्री. काव्यजंगल यांचें, ते मजकडेच उतरणार असल्याबद्दलचें एक पत्र मला आलेंच होतें. त्याप्रमाणें एके दिवशीं उजाडतच ते आमच्या वाड्यासमोर येऊन उपस्थित झाले ! त्यांना फार दिवसांनीं पाहून मला आनंद झाला. पण त्यांचें सामान पाहून मात्र माझी छाती दडपून गेली ! तब्बल एक मोठा थोरला खटारा पुस्तकांचे रुमालांनीं ठेंचून भरला होता ! आणि शिवाय त्यांच्या दोन हातांत दोन रुमाल होते ! त्या रुमालांच्या जबरदस्त वजनानें खटाऱ्याच्या बैलांचे तोंडाला फेंस आला होता !

" अहो, हें एवढें आहे तरी काय ? " मी विचारलें.

" माझे अप्रसिद्ध काव्यांच्या कांहीं चोपड्या आणल्या आहेत ! " काव्यजंगल किंचित हंसून म्हणाले. " माझ्या अप्रसिद्ध वाङ्मयाची थोडीफार कल्पना यावी, म्हणून नमुन्यादाखल हा माल आणला आहे. कोणी प्रकाशक आढळल्यास त्याच्या स्वाधीन हें करण्याचें ठरविलें आहे ! "

मी त्यावर कांहींच बोललों नाहीं. आणि बोलणार तरी काय ? अडली गाय आणि फटके खाय या न्यायानें मी निमूटपणें दोन हमाल लावून तो खटारा खालीं करविला आणि ते ग्रंथ माझ्या त्या दीड खणाच्या खोलींत शीग लावून रचून ठेवले !

परिषदेला अजून दोन तीन दिवस अवकाश होता. पण खरें म्हणाल, तर काव्यजंगल आल्याक्षणापासूनच माझे घरांत परिषद् चालू झाली, असें मला वाटलें! कारण, आपल्या निरनिराळ्या चोपड्या उघडून, त्यांतला थोडा मासला म्हणून कविराज मला एकसारख्या निरनिराळ्या कविता भयानक सुरांत वाचून दाखवीत होते! आणि मधून मधून मला चिमटे काढून 'कां? कशी बहार आहे?' असें विचारीत होते! मला वाटतें, मलाच काय, पण आमच्या वाड्यांतल्या एकाही माणसाला,—नव्हे कुत्र्या-मांजराला सुद्धां काव्यजंगल आल्यापासून झोंप ही काय चीज आहे, तिचा पत्ता नसेल!

शेवटीं एकदांचा परिषदेला आरंभ झाला. आणि तिचें मामुली कामकाज संपून, साहित्यभक्तांना परिचय करून देण्याचा समारंभ सुरू झाला! पहिल्या प्रथम माझे कविमित्र श्री. पुंडे हे आपला परिचय करून देण्यास उभे राहिले. ते म्हणाले—

"एवढ्या प्रचंड साहित्यभक्तांच्या समुदायाला मला आपली स्वमुखानें ओळख करून देण्याचा योग आला आहे, हें माझें महद्भाग्य आहे. पण हा माझा गौरव नसून, मी जो संगीत अंकलिपी नांवाचा ग्रंथ निर्माण केला, त्याचाच हा गौरव आहे असें मी समजतों! (टाळ्या.) हल्लीं मी कवाइतीवर कवितावद्ध पुस्तक लिहीत आहें, हें आपणांस कळविण्यास मला अभिमान वाटतो! पण या ठिकाणीं एका गोष्टीबद्दल मात्र मला होतकरू लेखकांना सूचना द्यावयाची आहे. ती हीच, कीं 'सरकारनें मंजूर केलेलें पुस्तक' या शब्दांना त्यांनीं हुरळून जाऊं नये. माझी संगीत अंकलिपी सरकारांत मंजूर झाली, तेव्हां मला खरोखर नोबेल प्राइझ मिळाल्याइतका आनंद झाला! पण अनुभवाअंतीं असें आढळून आलें, कीं पुस्तक खपण्याच्या दृष्टीनें या गोष्टीचा कांहींच उपयोग नाहीं!......"

"आपल्याला कविता करायला स्फूर्ति कशी झाली, याविषयीं चार शब्द......"

" हो हो ! त्याविषयींच चार शब्द सांगून मी आपलें भाषण संपविणार आहें. त्याची हकीगत अशी आहे, कीं मला अगदीं लहानपणापासूनच कवितांचा नाद होता. शाळेंतलें वाचनसुद्धां मी सुरावर वाचतों अशी पंतोजीची नेहमीं तक्रार असे ! पुढें जरा मोठा झाल्यावर तर मी कवि होण्याचा निश्चयच केला ! पण काय सांगाव, पुष्कळ दिवस खटपट केली, तरी कवितेचें कांहीं जमण्याचें लक्षण दिसेना ! असें जरी असलें, तरी माझें वाचन मात्र अव्याहत चालू होतें. लेखकाचें वाचन दांडगें असलें पाहिजे असें मी कोठेंसें ऐकलें होतें. त्यामुळें मी हातीं सांपडेल तें वाङ्मय खलास करीत सुटलों होतों. हातिमताई, गुलबकावली, नवनारीचरित्र, जादूचा सोटा, सिंहासनबत्तिशी वगैरे नामांकित ग्रंथ मी आत्मसात् करून टाकले होते. पण तरीसुद्धां कवितांचें कांहीं जमेना ! शेवटा मी अगदीं त्रासून गेलों. इतक्यांत योगायोग म्हणूनच कीं काय, आमचा एक लांबचा नातलग वसंत, हा मुंबईहून चार दिवस आमच्याकडे राहायला आला. मी कांहीं कादंबऱ्यांतून आणि मालेंतून जीं नायकांचीं वर्णनें वाचलीं होतीं, तसाच हुबेहूब मला तो दिसला. बूट, पाटलूण, कडकडीत इस्त्रीचा शर्ट, जाकीट, तुळतुळीत कॉलर, कुरतुडलेल्या मिशा, वगैरे त्याचा थाट पाहून मला त्याचेविषयीं फारच आदर वाटला ! आणि जेव्हां त्यानें आपण स्वतः कवि आहों म्हणून मला सांगितलें, तेव्हां तर तो आदर दुणावला ! पाउण-आणा मालेंत त्याच्या दोन कविता प्रसिद्ध झालेल्या होत्या आणि ते अंक त्याच्या ट्रंकेंत होते, ते मी पाहिलेसुद्धां. तो म्हणाला, प्रतिभा जागृत झाल्याशिवाय काव्य बनत नाहीं. मला त्याचें बोलणें पटलें. पण ती प्रतिभा कोठें असते, आणि तिला जागृत कशी करायची, हें मात्र मला समजलें नाहीं ! तो म्हणाला, मोठमोठ्या कवींची सुद्धां प्रतिभा झोंपलेली असते आणि मग ते त्या प्रतिभेवरच कविता करूं लागतात. त्यांत कठीण असें कांहीं नाहीं. तिला चार शिव्या हांसडल्या म्हणजे ती आपोआप वठणीवर येऊन चालूं लागते ! मला त्याचें हेंही बोलणें पटलें. कारण मीसुद्धां माझ्या प्रतिभेवर अगदीं संतापून गेलों होतों ! अहो, आमच्या

शेजारची ती एवढीशी पोर मथी, पण तिनें सुद्धां कविता रचली! गोप्यानें तर कवितांची जणूं रांगच लावली होती! आणि तो शेंबडा नाऱ्या! त्याची कविता तर आमच्या हस्तलिखित मासिकांत प्रसिद्धसुद्धां झाली! इतक्या थरावर गोष्टी आल्या तेव्हां मग मात्र मलाही राहवेना! आणि त्या क्रोधाच्या भरांत खालील काव्य आस्ते आस्ते निर्माण होऊं लागलें! मी प्रतिभेस उद्देशून म्हटलें—

ऊठ गे ऊठ। ही उघड झांकली मूठ!
देसायांची पोर ती मथी।
काव्य करी जरी असे धाकुटी।
तूं कां बनशी ऐशी हट्टी।
ऊठ गे ऊठ। ही उघड झांकली मूठ! १

गोप्यानें किति कविता केल्या।
तीन चोपड्या भरून गेल्या।
परि खंदा वीर तो न थकला।
ऊठ गे ऊठ। ही उघड झांकली मूठ! २

नाऱ्यासुद्धां कवी जाहला।
हस्तलिखित मासिकीं झळकला।
हे प्रतिभे! उघडीं डोळयांला!
ऊठ गे ऊठ। ही उघड झांकली मूठ! ३

झालें! अन मग काय? एकदां प्रतिभा उठली ती उठलीच! आतां ती अनावर झाली आहे. आणि उलट आतां तिला गप्प बसायला काय घेशील असें विचारण्याची पाळी मला आली आहे!"

एवढें बोलून पुंडे खालीं बसले आणि मग सुप्रसिद्ध ग्रंथकार श्री. नारोब खटपटे हे उभे राहिले! ते म्हणाले—"अध्यक्ष महाराज, आणि बंधुभगि-

नींनो, ग्रंथकार पुष्कळ होतात आणि होतीलही. पण यशस्वी ग्रंथकार कसें व्हावें या संबंधानें मी चार शब्द सांगणार आहें. सर्व ग्रंथकारांना आपला ग्रंथ सर्वमान्य व्हावा अशी इच्छा असते आणि आपल्या ग्रंथावर विरुद्ध टीका होऊं नये, असेंही माणसाला साहजिकच वाटतें. पण असा ग्रंथ कसा लिहावा, याचें रहस्य मात्र बहुतेकांना कळलेलें नसतें. तेव्हां तें रहस्य जर तुम्हांला कळायला पाहिजे असेल तर माझा 'ज्ञानेश्वरबोधामृतम्' हा ग्रंथ विकत घेऊन वाचा! हा ग्रंथ लिहिण्याला मला डोकें असें मुळींच खर्चावें लागलें नाहीं! फक्त कोरे कागद आणि शाई, एवढाच खर्च! पण अ असतांना माझा ग्रंथ सर्वमान्य झाला आहे! आणि त्यावर विरुद्ध टीका करण्याची अजून एकाचीही माय व्याली नाहीं! अहो, ज्ञानेश्वरबोधामृतम् म्हणजे काय आहे? ज्ञानेश्वरींतील उतारे! दुसरें काय? आणि ते निवडायला तरी मला कांहीं श्रम पडले आहेत का? काहीं नाहीं! ज्ञानेश्वरीचें कुठलेंही पान उघडावें, त्यांतल्या कुठल्याही दोन ओंव्या उतरून घ्याव्या आणि त्यांचेपुढें फार तर "अहाहा! काय ज्ञानोबांनीं बहार केली आहे!" असें लिहावें. माझा ग्रंथ मी असा तयार केला आहे! पण त्यावर चोहोंकडून अनुकूल अभिप्रायांचा नुसता तोबा उडाला आहे! बरोबरच आहे. अहो, माझ्या पुस्तकाला नांवें ठेवणें म्हणजे ज्ञानेश्वरांनाच मूर्खांत काढणें नव्हे का? आणि तसें करण्याचें सामर्थ्य कोणाला आहे? तेव्हां निमूटपणें माझ्या पुस्तकाला चांगलें म्हणण्यावांचून गत्यंतरच नाहींसें झालें आहे! वाङ्मयाचें हें क्षेत्र अगदीं अफाट असून सर्वांना मोकळें आहे! होतकरू लेखकांनीं इकडे जरूर लक्ष द्यावें!"

सुप्रसिद्ध ग्रंथकार नारोबा हे टाळ्यांच्या गजरांत खालीं बसल्यावर बजाबा नाटककार उभे राहिले. ते म्हणाले—"अलीकडे नाटककारांना रगड्न पैसा मिळतो असें लोक म्हणतात; पण त्यांत बिलकूल तथ्य नाहीं, हें मी माझ्या स्वतःच्या अनुभवावरून सांगतों! माझेजवळ आज घटकेला साडेएकोणीस नाटकें कंप्लीट लिहून तयार आहेत! पण मला अजून त्यांच्यापासून साडेएकोणीस दिडक्यांची देखील प्राप्ती झालेली नाहीं!

यावरून माझीं नाटकें भिकार आहेत असें समजूं नका ! अहो एकेक नाटक म्हणजे निवळ माल आहे ! पण हे मूर्ख नाटकवाले तीं पुरतीं वाचून बघायला देखील तयार नाहींत ! आणि मग कोणाचीं तरी भिकार नाटकें स्टेजवर आणून मागून रडत बसतात ! गडकऱ्यांचीं नाटकें लोकप्रिय झालीं आहेत, आणि मी विनयानें स्वतःला गडकऱ्यांचा चेला म्हणून म्हणवतों, हें साऱ्या बृहन्महाराष्ट्राला जाहीरच आहे ! पण असें जरी असलें, तरी,—मी आपलें तुम्हांला खाजगी म्हणून सांगतों,—मी खरोखर गडकऱ्यांवर हरएक बाबतींत अगदीं ताण करून सोडली आहे ! शब्दचमत्कार काय आणि अक्षरचमत्कार काय, नुसती लयलूट उडवून दिली आहे ! " *गणपत गडाचा गडकरी गटारांत गडगडत गेला* ! " या वाक्यांत नुसत्या ग चीच टोळी बांधून आणली आहे ! आणि प्रत्येक वाक्य आणि प्रत्येक प्यारा अस्सा बांधून काढला आहे ! कोठें नुसते टच तर कोठें नुसते नच ! शिवाय कोट्यांचें तर विचारूंच नका ! बरें प्रसंग तरी काय ! त्यांतला एखादा क्षुल्लक प्रसंग देखील तुमच्या अंगावर शहारे आणील ! मग सबंध नाटक पाहिल्यावर काय होईल, तें सांगायलाच नको ! आणि असें एक नाटक नव्हे, तर तब्बल एकोणीस नाटकें आज घटकेला तयार आहेत आणि छत्तिस संविधानकें या वीतभर डोक्यांत याक्षणीं नाचत आहेत !..."
पण एवढेंच भाषण करून बजाबा खालीं बसले. म्हणजे रागानेंच ते असे खालीं बसले ! कारण अजून पाउणशें साहित्यभक्तांना आपला परिचय करून द्यायचा आहे, म्हणून आटपतें घ्या, असें चिटणीस म्हणाले. आणि अर्थातच बजाबांना कांहीं तें सहन झालें नाहीं !

नंतर माझे सन्मान्य पाहुणे आणि परममित्र श्री. काव्यजंगल हे आपला परिचय करून देण्यास उभे राहिले, तेव्हां टाळ्यांचा प्रचंड कडकडाट झाला ! आणि तो ऐकून मलासुद्धां अगदीं गुदगुल्या झाल्या ! एवढा प्रसिद्ध आणि खंदा साहित्यभक्त आज माझा पाहुणा आहे, हें मनांत आल्यावर मला कां अभिमान वाटूं नये ? आणि खरोखर विचार केला, तर काव्यजंगल यांना उभें राहतांच ज्या एवढ्या टाळ्या मिळाल्या त्यांत

आश्चर्य करण्यासारखें कांहींच नाहीं. त्यांचा पिंजका व कर्कश आवाज, त्यांचे भयानक डोळे, त्यांचें तें कलत्या डोलकाठीप्रमाणें तिर्कस उभें राहणें, त्यांची कविता म्हणण्याची लोकविलक्षण धाटणी, आणि त्यांच्या प्रसिद्ध व मुख्यतः अप्रसिद्ध असलेल्या कवितांचा अफाट फांपट पसारा, यामुळें त्यांना जी एवढी प्रसिद्धि आणि लोकप्रियता (!) लाभली, त्याला ते निःसंशय पात्र आहेत.

असो. टाळ्यांचा कडकडाट थांबल्यावर श्री. काव्यजंगल यांनीं किंचित् स्मित करून भाषणाला सुरवात केली. "माझ्या साहित्यप्रेमी मित्रांनो, मी माझा परिचय करून देण्यास आपल्यापुढें यावेळीं उभा राहिलों आहें. माझें नांव—बाकी नांवाशीं काय करायचें आहे? आणि इतक्याउपर जर माझें नांव, गांव, जात, गोत्र, माझी उंची वगैरे माहिती तुम्हांस पाहिजे असेल, तर त्याचें जें मी स्वतंत्र टांचण करून आणलें आहे, त्यावरून कळून येईलच. आतां या ठिकाणीं माझा परिचय, म्हणजे माझ्या प्रतिभेचा परिचय तुम्हांस करून द्यावयाचा आहे. मी एवढें वाङ्मय कसें निर्माण केलें, याबद्दल पुष्कळांना अतिशय आश्चर्य वाटत असतें. पण खरोखर मला त्यांत तसें कांहींच वाटत नाहीं. प्रतिभेचा बंधारा फुटून ती एकदां वाहूं लागली म्हणजे मग ती आंवरतांनाच कठीण जातें, असें माझ्या एका कविमित्रांनीं मजाशीं सांगितलेंच आहे. माझी प्रतिभा कशी जागृत झाली ती हकीगत तुम्हांस सांगायची म्हणजे मला खरोखर मोठा पेंच पडला आहे! कारण, ती हकीगत सांगायची म्हणजे माझ्या प्रेमाच्या नाजूक गोष्टीच तुमच्यापुढें मांडाव्या लागतील! शिवाय त्या अतिशय करुणाजनक असल्यामुळें त्या ऐकतांना तुमच्या काळजाला घरे पडतील! पण त्याला नाइलाज आहे! होतकरू कवींना मार्ग दाखविणें माझें कर्तव्यच आहे. आणि त्यासाठीं मला तें सर्व सांगितलेंच पाहिजे!

सज्जनहो, प्रेमाचा तडाका हा मोठा कठीण आहे! मला वाटतें, या गोष्टीचा थोडाफार परिचय प्रत्येक प्रतिभाशाली कवीला असलाच पाहिजे.

या प्रणयाच्या तडाक्यांतून जे सहीसलामत पार पडले, त्यांचें ठीकच आहे! पण हें भाग्य सर्वांनाच लाभतें असें नाहीं. निदान मी तरी तेवढा भाग्यवान नाहीं, हें तुम्हांला आतां कळून येईलच!

साहित्यसेवकांनो, कवींचें हृदय किती कोंवळें असतें, तें तुम्हांला सांगितलें पाहिजे काय? आणि कवी किती कोंवळ्या वयांत प्रेमाच्या कचाट्यांत सांपडतो, हेंही तुम्हांला अवगत असलेंच पाहिजे! मी त्यावेळीं कितव्या इयत्तेंत होतों, तें मला आतां नक्की आठवत नाहीं. पण तेव्हां एके दिवशीं बाबांचें पुढील भाषण माझ्या कानावर आलें. बाबा आईजवळ बोलत होते. ते म्हणाले—"कारट्याची पत्रिकाच आधीं कोठें जुळते आहे? आणि शिवाय रामभटजी म्हणतो, पोरगा शिकलेला पाहिजे. तेव्हां तो या ठोंब्याला ठकी देईल असें मनांतसुद्धां आणूं नकोस. आणि याचें लग्न तरी इतक्यांत कशाला करायचें? दुसऱ्याची पोर नाहक बुडवायला? सारा मूर्खपणाचा बाजार!"

झालें! एवढेंच बोलून बाबा चालते झाले. पण त्यांचा प्रत्येक शब्द माझें काळीज चिरीत गेला! कवींनो, आमच्या शेजारच्या रामभटाची मुलगी ठकी हीच माझ्या करुणकहाणीची नायिका होय, हें तुम्हांला आतां कळून आलेंच असेल! तसें म्हणाल, तर ठकी एरव्हीं कांहीं मला आवडत नव्हती. पण आमच्या पत्रिका पहात आहेत ही कुणकुण माझ्या कानीं येतांच माझा दृष्टिकोण एकाएकीं बदलला! आणि ठकीचें रूप मला लवकरच वेडें करून सोडणार असें मी मनाशीं ठाम ठरवून टाकलें! ठकी माझी भावी सहधर्मचारिणी आहे या नात्यानें मी माझ्या मनांत अनेक मनोरे उठवीत असतां जेव्हां बाबांचे हे शब्द माझ्या कानावर पडले, तेव्हां निराशेनें माझी किती भयंकर स्थिति झाली असेल, याची तुम्हांला कल्पना तरी होईल काय? ( एक श्रोता मोठ्यानें हुंदका काढतो! )

मी सज्जांतून ठकीच्या घराकडे दुःखानें पाहून "साध्य नसे मुनिकन्या" या पद्याचा चरण घोळून घोळून म्हणूं लागलों. पण तें जुनें झालेलें पद्

माझ्या दुःखाला पुरें पडेना ! शिवाय त्या म्हातारड्याला मी मुनि म्हणण्यास बिलकूल तयार नव्हतों ! पण अगदीं त्याचवेळीं माझ्या प्रतिभेनें एकाएकीं जोर केला ! इतक्यांत ठकीही आपल्या पडवींत आलेली माझ्या दृष्टीस पडली ! मग काय विचारतां ? प्रतिभा एकदम खवळून खालील गझलचे रूपानें मुखांतून बाहेर पडूं लागली ! ठकी ही एखाद्या पक्ष्याप्रमाणें दोन्ही पाय जवळजवळ एकदमच उचलून उडी मारल्यासारखी चालत असे आणि त्यामुळें आम्ही तिला पांखरूं म्हणून चिडवीत असूं. त्यामुळें यावेळींही तीच गोष्ट माझ्या गझलमधून प्रथमच बाहेर पडली !

माषूक है किति ही परी, मज वाटतें हें पाखरूं ।
शाहीर मी कां घाबरूं ? ॥

ही हांसरी अन् लाजरी ! ही बांसरी मी अलगुजा !
मी लष्करी ही गालिचा ! ॥

माझी ठकी ही प्रियतमा, परि पत्रिका ही घातकी !
मम कुंडली ही पातकी ! ॥

रामभटजी शिकलेला मुलगा पाहिजे असें म्हणतो, तेव्हां त्याला उद्देशून माझ्या गझलनें त्याला सवाल टाकला—

शिक्षणातें काय कपि हा पाहतो मज ना कळे !
प्रेम माझें ना ढळे ! ॥

'प्रेममदिरा' 'इष्कप्याला' काय यातें ठाउका ?
या मर्कटातें दाउं का ? ॥

मी दुःखानें बेहोष होऊन माझ्या या अभिनव काव्यांतला एकेक चरण मोठ्यानें गुणगुणत सज्जांत फिरत होतों. 'मी लष्करी ही गालिचा' ही माझ्या काव्यांतली उपमा तर मला फारच बहारीची वाटली ! मी लष्करी, अन् तूं गालिचा ! अहाहा ! अगदीं खरें आहे ! हे ठके ! ठके ! माझ्या गालिचा !"

" कायरे म्हाद्या ? " नुकतीच नाक शिंकरण्यासाठीं पडवींत आलेली ठकी माझें हें भाषण ऐकून म्हणाली ! " आतां रे कसला गालिचा ? तुमचा गालिचा मी कालच पोंचवला आहे ! "

" तो निर्जीव गालिचा मला काय करायचा आहे ? " मी दीर्घ निश्वास टाकीत ठकीला म्हटलें. " ठके, तूंच माझा गालिचा आहेस ! "

" मेल्या, मला गालिचा म्हणतोस का ? मग तूं कोणरे ? तूं गोणपाट ! "

एवढें बोलून ठकी नाक उडवीत झणकाऱ्यानें म्हशीच्या गोठ्यांत शिरली. अहाहा ! तिनें मला जी गोणपाटाची उपमा दिली, ती किती बहारीची आहे ! एवढीशी पोर, पण तिच्यांत किती काव्य भरलें आहे ! आणि प्रतिभा तरी किती दांडगी ! ती हीं एकदोन वाक्यें बोलली; पण त्यांत किती श्लेष, आणि केवढा उच्च दर्जाचा विनोद ! ती वरून रागावलेली दिसली खरी. पण तिचे अंत:करणांत मजविषयींच्या प्रेमाचा प्रचंड झरा वाहात असला पाहिजे, हें मी केव्हांच ओळखलें होतें ! मी सज्जांत उभा आहें असें पाहून, मला भेटण्यासाठीं ती नाक शिंकरण्याचें निमित्त करून बाहेर आली असली पाहिजे, हें उघडच आहे ! काय रोमँटिक पोर आहे ! पण मी मनांत म्हटलें, ठके ! हें सारें व्यर्थ जाणार ! आपलें मधुरमीलन या जगांत होईल असा रंग मला दिसत नाहीं. प्रिये—

या मृत्युलोकीं मीलनातें संधि नाहीं आपुल्या ।
स्वर्गलोकीं जाउं या ! ॥

श्री. काव्यजंगलांनीं आपल्या या गझलमधील ही शेवटची ओळ म्हणतांना आपले डोळे घट्ट मिटले आणि क्षणभर जणुं त्यांची समाधीच लागल्यासारखें वाटलें ! त्यांचा हा प्रेमभंग आणि त्यामुळें हृदय फुटून त्यांतून निघालेलें हें रसरशीत काव्य ऐकून माझें हृदय तर आंतल्या आंत कढूं लागलें ! पण सगळेच लोक इतक्या कोंवळ्या मनाचे कोठून असणार ?

" मग आपण अजून मृत्युलोकांत कां रेंगाळतां आहां ? " श्री. काव्यजंगलांना उद्देशून श्रोत्यांतला एक वात्रट मनुष्य उद्गारला ! मला तर त्याचा